नवभारत मे २०१२



# 'ग्रेस'फुल शैलीचे गारूड

क्षितिजे भेदून अनंताकडे
उसळला साहित्य - रत्नाकर!

जी. डी. पी.चा तोकडेपणा

छोट्या राज्यनिर्मितीचे वाढते
बहुआयामी पेच

ग्रंथवेध - जवाहरलाल नेहरूंच्या
मतप्रणालीची जडणघडण

मानवी मनाचे शिक्षण व विकास

अनुक्रमणिका



नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)




महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com




# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

**– संपादक मंडळ**

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६५ | अंक ८ | मे २०१२
वैशाख/ज्येष्ठ शके १९३४
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संग्रहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई – ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई – ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका






# नवभारत

## मे २०१२

## अनुक्रमणिका

## संपादकीय टिपणी

१) मार्च महिन्यात कवी ग्रेस यांचे निधन झाले. तोपर्यंत 'एप्रिल'चा अंक तयार झाला होता. त्यामुळे 'कवी ग्रेस यांच्याविषयी 'नवभारत'ला वाटणारा आदर व्यक्त करणारा लेख प्रसिद्ध करता आला नाही. या अंकात शैलीशास्त्राचे अभ्यासक प्रा. डॉ. सुरेश भृगुवार यांचा ग्रेस कवींच्या दोन कवितांचे शैलीविश्लेषण करणारा विशेष लेख देत आहोत.

२) प्रा. डॉ. रत्नाकर बापूराव मंचरकर हे 'नवभारत'चे फार जुने लेखक. १९६८ साली त्यांचा पहिला लेख 'नवभारता'त प्रसिद्ध झाला. फेब्रुवारी महिन्यात त्यांचे दुःखद निधन झाले व आमचा एक स्नेहशील लेखक आम्ही गमावला. त्यांच्या मृत्यूची वार्ता आम्हाला फार उशिरा कळली. प्रा. मंचरकरांचे अन्तेवासी प्रा. डॉ. अनिल सहस्रबुद्धे यांच्याकडून आम्ही मंचरकरांच्या कार्याचा आढावा घेतला. लेख मागवून घेतला व तो या अंकात प्रसिद्ध करीत आहोत.

३) एप्रिलच्या अंकात पान २३ वर एक कोष्टक दिले आहे. खेदाची गोष्ट अशी की, ते इतक्या बारक्या आकारात छापले आहे की, भिंगातूनही वाचता येत नाही. ते इथे मोठ्या आकारात छापले आहे.

एकंदर ग्रंथांची विषयावर वाटणी (सन १८८३ पासून सन १८९७ अखेर)

| वर्ष | नवीन ग्रंथ | | पुनःप्रकाशित | भाषांतर | एकूण | हुन्नर | चरित्रें | नाटकें | कादंबऱ्या | इतिहास |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | प्रथम आवृत्ति | पुनरावृत्ति | | | | | | | | |
| १८८३ पासून १८९७ अखेर वर्षे १५ | * २२९९ | ७९६ | ७६७ | ! ५४२ | ४४०४ | ९६ | ९७ | २८७ | १९४ | ६८ |
| | | | | | भाषान्तरे | ९ | १३ | ४६ | ९९ | ११ |

| भाषाज्ञान | कायदा | वैद्यक | किरकोळ | काव्ये | राजनीति | तत्त्वज्ञान | धर्म | शास्त्र गणितादि | शास्त्रसृष्टपदार्थज्ञा | प्रवासवर्णन | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १३७ | १७ | १८ | ७९१ | ३११ | १८ | ३३ | ३१ | ५३ | ९७ | ९१ | २२९९ |
| ७ | २३ | ४ | १९७ | ११ | १३ | ३० | ४५ | ८ | ८ | २ | ५४२ |

* या दोन बेरजा मिळतात.   ! या दोन बेरजा मिळतात.

अनुक्रमणिका

# 'ग्रेस'फुल शैलीचे गारूड

डॉ. सुरेश भृगुवार

कविवर्य ग्रेस (माणिक गोडघाटे) ह्यांच्या कवितेची जबरदस्त मोहिनी दीर्घकाळापासून रसिकांच्या मनावर होती, अजून आहे व पुढेही राहील. याचे प्रमुख कारण हे, की त्यांनी त्यांच्या कवितांतून वैपुल्याने इतस्ततः केलेली नवशब्दांची पखरण होय. कुसुमकोमल, नादमधुर, अर्थगूढ, आशयगर्भ अशा अपरिचित नव्या अभिनव शब्दांची सदा-बहार फुलबाग ग्रेस यांनी आपल्या कवितांमधून फुलविली आहे. परंतु हे असे त्यांनी केवळ शब्दांच्या आहारी जाऊन केलेले नाही.

कविवर्य 'बी' लिहितात :-

काव्य नव्हे सुंदर शब्दांचा नादमधुर मेळ
अर्थचमत्कृतीचाही नोहे डोंबारी खेळ
निसर्गसृष्टीचीं सादृष्यें, नीतिपाठ भव्य
थाटदार घाटाची रचना केवळ नच काव्य.

–(कविवंदन)

काव्याबद्दलच्या कल्पनांत आता कालपरत्वे बदल होणे स्वाभाविकच आहे. बदलत्या काळातील बदलत्या अभिरुचीनुसार हे बदल होत असतात.

कवी ग्रेस ह्यांच्या कवितेला हे मापदंड लावता येत नाहीत. ही संपूर्णतः आगळी-वेगळी, अभूतपूर्व कविता आहे. अद्‌भुत प्रतिभेचे वरदान लाभलेल्या असामान्य कवीची ही कविता! ठरीव, बेतशीर, फूटपट्ट्यात मोजता न येणारी!

शब्द अर्थाआधीं यावा
हें तों ईश्वराचें देणें;

– (झोंपलीं ग खुळीं बाळें)

– असे मर्ढेकर लिहितात. ह्या ओळींवरून भवभूतीच्या 'उत्तररामचरितम्' नाटकातील पुढील श्लोकाचे स्मरण होते. :-

"लौकिकानां हि साधूनां अर्थं वागनुवर्तते।
ऋषीणां पुनराद्यानां वाचमर्थोऽनुधावति।।"

(अर्थात, लौकिक सज्जनांच्या बाबतीत शब्द अर्थानुगामी असतो; तर आद्य ऋषींचे शब्द अर्थाआधी येऊन, अर्थ शब्दामागे धावतात.) आद्य ऋषींच्या तोंडून शब्द भावोर्मीसरशी अकस्मात बाहेर पडतो. नंतर त्यांना अर्थ प्राप्त होतो.

ग्रेसच्या कवितेत येणारे नवनवे, नित्यनूतन, सर्वस्वी अपरिचित शब्द एका भावोर्मीसरशी अवतरतात. अर्थात शब्द (= वाणी) आधी उच्चारला जातो. अर्थ शब्दाचे अनुसरण करतो. ग्रेसच्या कवितेतील शब्द हे त्यांचे सहजोद्‌गार आहेत. ही त्यांची अकस्मात प्रकाशित होणारी प्रस्फुरणे होत.

शैली म्हणजे कवीच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाचा कलात्मक आविष्कार होय. ग्रेसच्या कवितेतील नव-अभिनव शब्दांच्या योजनेत आणि अन्य शैलीउपायांतून (Stylistic Devices) त्यांच्या वाङ्मयीन व्यक्ति-मत्त्वाचा कलात्मक आविष्कारच प्रकट होतो. अर्थात् ग्रेसच्या कवितेतून त्यांची पृथगात्म शैलीच प्रकट होते. म्हणूनच 'ग्रेस' ह्यांची कविता 'निरर्थक सुंदर व मोहक शब्दांची उतरंड होय.' अशा आशयाचे कविवर्य दिलीप चित्रे यांचे विधान ग्रेसच्या कवितेच्या संदर्भात अप्रस्तुत व अनुचित ठरते. असो.

ह्या प्रास्ताविकानंतर आता ग्रेस यांच्या अनुक्रमे 'दुपार' व 'आई - १' ह्या दोन कवितांचे शैलीविश्लेषण व शैलीवैज्ञानिक समीक्षा पुढील भागात करू.

तत्पूर्वी वाचकांच्या सोयीसाठी त्वरित संदर्भार्थ (For ready reference) प्रथम 'दुपार' ही संपूर्ण कविता देत आहे.

### दुपार

विवर्त नभ एकटें सतत तापलेली हवा
उन्हात जणु मैथिली तुजसि शोधिते राघवा....
विवस्त्र मृगतंद्रिने क्षितिज वाहतें कीं पुढें
तृषार्त बिलगे मला सभय चातकांचा थवा

अनुक्रमणिका






तुझे तटचि पांगळे तरिहि विश्व यावें गळीं
सुवर्णवन पेटलें तुझिं न आसवें मोकळीं...
प्रशांत नगरांत या घरचि सापडें ना मला
जिथें अधर गोंदिला पिळुनि वासनेचा दिवा

विराण नूपुरापरी नभचि तीक्ष्ण झालें निळें
उन्हांत जणुं दीप्तिचें फुटुनि सांडतें कीं तळें
विदग्ध प्रतिमेपरी सगुण ऊन झेलूं नको
तुझे अमल दुःख दे मजसि तेवढा जोगवा....

– (संध्याकाळच्या कविता)

ही कविता 'पृथ्वी' ह्या अक्षरगणवृत्तात आहे. त्यांच्या अन्य कविताही विविध अक्षरगणवृत्तांत आहेत. [पृथ्वी ('संयोगिनी', 'वाराणसी', 'सावली', 'हांक'), शिखरिणी ('नदीच्या काठाने'), शार्दूल विक्रीडित ('हळदीचे हात'), सुमंदारमाला ('चुडा', 'चांदणे')]

वृत्तबद्ध रचनेतूनही त्यांचे रचनाकौशल्य दिसून येते. वृत्तादी बंधनेही त्यांच्या शब्दांकित अभिव्यक्तीला बाधा पोचवू शकली नाहीत. जुनी अक्षरगणवृत्ते घेऊन त्यांनी त्यांत नवकविता गुंफली व वृत्तांनाही पुनरुज्जीवित केले, हे त्यांचे कार्य महत्त्वाचे आहे. 'दुपार' कवितेच्या प्रत्येक ओळीतील ९, १० व ११ ही अक्षरे लघुमात्रेची आहेत. तेवढ्याच मात्रेचे तीनअक्षरी शब्द त्याच स्थानी येऊन ह्या सर्व शब्दांनी परस्परांचा तोल सांभाळला आहे. (बघा :- 'सतत', 'तुजसि', 'क्षितिज', 'सभय', 'तरिहि', 'तुझि न', 'घरचि', 'मिळुनि', 'नभचि', 'फुटुनि', 'सगुण', 'मजसि') आठव्या अक्षरानंतर यती आहे. या शब्दयोजनेने शब्दांची अंतर्गत लय साधून वृत्तांत व लयीत सहजता आलेली आहे.

**कवितेत उपयोजित शैलीउपाय :-**

**(१) शब्दविवेक (Choice of Words) :**

अ) नामे :-नभ, हवा, उन्हात, मैथिली, राघवा, मृगतंद्रिने, क्षितिज, चातकांचा, थवा, तटचि, विश्व गळी, सुवर्णवन, आसवे, नगरात, घरचि, अधर, वासनेचा, दिवा, नूपुरापरी, नभचि, उन्हांत, दिप्तीचे, तळें, प्रतिमेपरी, ऊन, दुःख, जोगवा.

ब) सर्वनामे :- तुजसि, मला, तुझे, तुझिं, या, मला, तुझे, मजसि.

क) विशेषणे :- विवर्त, एकटें, विवस्त्र, तृषार्त, प्रशांत, विराण, तीक्ष्ण, निळे, विदग्ध, सगुण, अमल, तेवढा, पांगळे.

ड) क्रियाविशेषणे :- सतत, पुढे, सभय, जिथे.

ई) क्रियापदे :- शोधिते, वाहते, बिलगे, यावे, पेटले, न मोकळी, सापडें ना, गोंदिला, झालें सांडते, झेलूं नको, दे.

फ) कर्मणी भूतकालवाचक धातुसाधित विशेषण :- तापलेली.

य) उभयान्वयी अव्यये :- जणु, की, तरिहि, जणु, की.

र) पूर्वकालवाचक धातुसाधित अव्यये :- पिळुनि, फुटुनि.

**(२) नवीन शब्द वा शब्दांचे नवीनीकरण (Coinage/Neologism)**

हा शैलीउपाय ग्रेसच्या कवितेत वैपुल्याने आढळतो. कवितेची भाषाही प्रवाही भाषा होय. ह्या भाषेत नित्य नवनव्या शब्दांची भर पडत असते. भाषा नवशब्दांचे नेहमीच स्वागत करते. नव्या शब्दांना वाव मिळाल्याने भाषेत चैतन्य खेळते. नवशब्दांचे आगमन भाषेच्या जिवंतपणाचे लक्षण आहे.

बोनामी डोब्री म्हणतो, "परिवर्तनीय भाषा हीच जिवंत भाषा होय. शब्द, शब्दसंहती, रूपके, दृष्टिकोणाची माध्यमे वारंवार वापरून झिजतात. त्यामुळे कोणताही चांगला लेखक नेहमी शब्दांची नवी नाणी पाडतो. हे खरे, की तो पूर्णतः नवीन असे अनेक, किंबहुना एकही शब्द शोधून काढू शकत नाही; तर तो काय करतो, की जुन्याच शब्दांची वेगळेपणाने रचना करतो, तो त्यांची नव्या रीतीने जोडणी करतो; व प्रत्यक्ष निरीक्षणाने जाणवलेले ताजे टवटवीत व नेमक्या अर्थाचे शब्द निवडून योजतो व रटाळ पुनरुक्ती टाळतो."

शब्दांचे नवीनीकरण चार प्रकारांनी होते :-

१) परिचित अर्थ व्यक्त करण्यासाठी नवीन शब्दरूप नाणे पाडणे. २) नवा आशय (अर्थ) व्यक्त करण्यासाठी एखादा नवा शब्द बनवून वापरणे. ३) जुन्या शब्दांचा रूढ अर्थाहून वेगळ्या अर्थी प्रयोग करणे. ४) अजून जिला लोकमान्यता मिळालेली नाही, अशी शब्दसंहती बनवून ती वापरणे. डोब्री म्हणतो, "It is easy enough to recognise the originality of a writer by

the words he uses."

कवी आपल्या निर्मितिपूर्व अनुभवांना शब्दबद्ध करण्यासाठी समर्पक शब्दांची निवड करीत असतो. कवीची संवेदनशीलता सर्वसामान्यांहून तीव्र-तरल असते. त्यामुळे त्याच्या अपूर्व अनुभूतीची उंची गाठायला रूढ शब्द थिटे पडतात. ते पुरेसे अर्थक्षम व आशयसंप्रेषक नसल्यामुळे कवी अस्वस्थ होतो. त्याच्या मनाची उलघाल होऊ लागते. त्याचे अंतःकरण ढवळून निघते व एका भावोर्मीसरशी एक नवे शब्दशिल्प कवितेसह बाहेर पडते. या शब्दशिल्पाला नवजात शिशूची अभूतपूर्व नव्हाळी लाभलेली असते. असा हा शब्द शब्दकुटुंबात स्वतःचे कायमचे स्थान प्राप्त करतो.

नवशब्दांच्या आगमनाची प्रक्रिया ही अशी आहे. 'दुपार' ह्या कवितेत शब्दविवेक ह्या शैलीउपायाच्या अंतर्गत कवीने विशेषणांचा वापर अधिक कौशल्याने केलेला आहे, हे लक्षात येते. परिचित शब्दांना अपरिचित विशेषणे योजून नवीनीकरणही साधलेले आहे. विवर्त नभ, विवस्त्र मृगतंद्री, पांगळे तट, विराण नूपुर, तीक्ष्ण नभ, विदग्ध प्रतिमा, सगुण ऊन, अमल दुःख या सर्व विशेषणांनी शैलीय सौंदर्य साधले आहे. तटाला पांगळे हे विशेषण योजून त्याचे मानुषीकरण केलेले आहे. (हासुद्धा एक शैलीउपाय आहे.) 'वासना' ह्या शब्दाला षष्ठीविभक्तीचा प्रत्यय जोडून तो 'दिवा'च्या विशेषणाचे कार्य करतो. वासनेचा दिवा हे नवीनीकरणच आहे.

वरील सर्व विशेषणे कवीच्या शैलीची निदर्शके (Style Markers) आहेत. यांवर कवीची नाममुद्रा अंकित आहे.

ह्या नवशब्दप्रयोगातील शैलीय सौंदर्यवैशिष्ट्ये पुढे बघू.

**शैलीविश्लेषण व कवितेचा साकल्याने सौंदर्यबोध:**

रणरणत्या उन्हात होरपळणारी दुपार व अशा तप्त दुपारी कवितानायक 'मी' व 'तिचे' (नायिकेचे) होरपळणारे जीवन ह्या कवितेत उत्कृष्टपणे शब्दांकित केलेले आहे. हे केवळ दुपारचे चित्र नाही. ही एरव्हीची दुपार नाही. ही विवक्षित दुपार आहे. दुपार ही पार्श्वभूमी आहे. अर्थात ही दुपार व दुपारचे ऊन हेसुद्धा सगुण, साकार व बोलके आहे.

'विवर्त नभ एकटे' ह्या शब्दांनी कवितेचा आरंभ आहे, एकदम लक्ष वेधून घेणारा. पुढे 'सतत तापलेली हवा' हे शब्द सहजपणे उतरलेत. नभाला दिलेले 'एकटे' हे विशेषण बोलके व मार्मिक आहे. वस्तुतः आकाश एकच असल्याने ते नेहमीच एकटे राहील. पण आजच्या तप्त दुपारी कायम तापलेल्या हवेत ते एकटे म्हणजे एकाकी आहे. नभाला आज उंच भराऱ्या मारणाऱ्या पाखरांची सोबत नाही. त्यांचा आवाजही नाही. (मिटूनि बसली पंख पाखरें) 'एकटे' ह्या विशेषणाने कवीने खगांचा उल्लेख न करताही त्यांची आकाशातील अनुपस्थिती दाखवून दिली आहे. हे 'शब्दलोप' (Deletion) ह्या शैलीउपायाचे उत्तम उदाहरण आहे. येथे कवीचे शैलीय सौंदर्य प्रकट होते.

'सतत तापलेली हवा' ह्या शब्दात 'त' ची त्रिवार आवृत्ती तप्ततेचा गडदपणा जाणूवन देते. अशा तप्त तापद उन्हात 'जणु रामाला शोधायला निघालेली मैथिली' अशी कल्पना मांडून, रसिकांना वनवासी राम व ग्रीष्म-माध्यान्ही त्याला शोधायला निघालेली वनवासिनी सीता ह्या दोघांच्याही जिवाची व मनाचीही काहिली....! हे चित्रदर्शन होते. 'उन्हात जणु' हे दुसऱ्या ओळीतील आरंभीचे शब्द पुन्हा दहाव्या ओळीत आवृत्त करून, प्रखर उन्हाच्या झळीच्या सनातन तीव्रतेची जाणीव करून दिलेली आहे.

तिसऱ्या ओळीतील कल्पना वर्णित विषयाशी सुसंवादी आहे. मृगजळामागे धावणारा तृषार्त हरिण, ज्या एकाग्र तंद्रीत धावतो ती मृगतंद्री! ह्या तंद्रीला लावलेले 'विवस्त्र' हे विशेषण लक्षणीय आहे. 'विवस्त्र'चा अर्थ आपण जाणतो. वस्त्रांचे बंधन नको, अनावृत. मृगतंद्री ही बेभान, बेलगाम, स्वैर व स्वच्छंद आहे. जळव्याकुळ मृगतंद्रीत कुठलेही भान मृगाला नाही. एखाद्या व्यक्तीवर प्राणसंकट आल्यावर, जीव वाचवायला पळताना प्रसंगी त्याला वस्त्राचेही भान नसेल. तशी ही विवस्त्र मृगतंद्री! ह्या (व कदाचित याहून अधिक) भावच्छटा कवीला अभिप्रेत असतीलही. म्हणून 'विवस्त्र' हे विशेषण शैलीय सौंदर्योत्पादक ठरते. यातून रणरणत्या उन्हात मृगाच्या जलाविना अतृप्तीची आत्यंतिक व्यथा कवीने शब्दांकित केली आहे.






"क्षितिज वाहते की पुढे." मृगजळामागे धावणारा हरिण, त्याला वाटतं दूर पाणी आहे, जवळ जातो. पाणी नसतं. पुन्हा दूर बघतो. दूर दूर क्षितिज व पुन्हा मृगजळ. पुन्हा धावत जवळ जातो. पाणी नसतंच– नव्हतंच! क्षितिज पुढे पुढे धावते व त्यामागे मृगजळही वाहताना दिसते. क्षितिज – मृगजळ वाहते, असा भास मृगाला होतो. वाहणे हा पाण्याचा गुणधर्म. म्हणून वाहते मृगजळ हरिणाला दिसते. क्षितिजामागे मृगजळ वाहते, ह्या आभासात्मक घटनेत तर प्रत्यक्षात पाणी नाहीच. म्हणून क्षितिज व मृगजळ या दोहोंत मृगजळ ह्या शब्दाचा लोप करून क्षितिज वाहत आहे, अशी कवी कल्पना करतात. आणि वाहते हे पाण्याला लागू पडणारे क्रियापद क्षितिजाशी जोडून कवीने अन्यधर्मारोप ह्या शैलीउपायाचे सौंदर्य प्रकट केले आहे. येथे क्षितिज वाहते, अशा शब्दयोजनेतून नवीनीकरण साधले आहे. अखेर मृगाला क्षितिज व जल दोन्हीही प्राप्त होत नाहीत.

चातक पक्षी तर स्वाभिमानी. कुणापुढेही मान झुकविणार नाही. नभातून पडणारे पाणीच पिणार. पण ग्रीष्म माध्यान्ही आकाशात जलद (= मेघ) कसे असतील? म्हणून तृषार्त चातकांचा थवा 'मी'ला येऊन बिलगतो. कदाचित 'मी' त्यांची तृष्णा भागवील. पण हाही तृषार्त! चातक व 'मी' सारेच समदुःखी! येथे बिलगें हे क्रियापद मार्मिक व अर्थप्रसरशील आहे. संकटांत समदुःखी परस्परांना बिलगतात. 'बिलगे'या उचित शब्दयोजनेचे अद्‌भुत कौशल्य दाखविले आहे. शब्दविवेक म्हणतात तो हाच होय.

"तुझे तटचि पांगळे .... न आसवें मोकळीं!"

सारे विश्वच गळाशी (गळ्याशी नव्हे!) आणण्याची धडपड; पण ते गळाला लागत नाही व तट तर पांगळे आहेत; पण तरीही विश्व मुठीत घेण्याची धडपड का? तुझे तट याचा अर्थ 'मी'च्या प्रेयसीचे तट हे तर पांगळे आहेत. म्हणजे प्रेयसीची हिंमत तर प्रसंगी डगमगणारी आहे. तरीही प्रेयसी व तिचे विश्व स्वतःच्या मुठीत यावे, हा 'मी'चा हट्ट. अशा तप्ततापद दुपारी तिच्या दुःखासह व तिच्या भावविश्वाची सोबत म्हणून 'मी'ला ती हवी आहे. सुवर्णवन पेटले आहे. (ग्रीष्म माध्यान्हीचे सुवर्णकांतीसम पेटलेले ऊन म्हणजे सुवर्णवन.) अशा वेळीही तू तुझ्या अश्रूंना मोकळी वाट दिली नाही. अर्थात तिची आसवे व दुःखे मोकळी होत नाहीत, हा भाव येथे ध्वनित होतो.

"प्रशांत नगरात या .... पिळुनि वासनेचा दिवा"

जिथे वासनेचा दिवा 'पिळून' अधर 'गोंदिला' ('पिळूनि' व 'गोंदिले' ह्या दोन्ही शब्दांची योजना बह्वर्थप्रसव आहे.) आहे, ते घर या प्रशांत नगरांत शोधूनही सापडत नाही. सर्व घरांची बंद दारे! ग्रीष्मातील दुपारी सर्व आपापल्या घरी शांत झोपलेले! प्रशांत नगर!

विराण नूपुरापरी नभचि ..... मर्जिस तेवढा जोगवा...

विराण नूपुर! विराण म्हणजे वैराण, ओसाड, उजाड. एखादे शेत, मोकळी जागा – ज्यात काही उगवू शकत नाही अशी जागा, यासाठी वापरले जाणारे विशेषण नूपुरासाठी कवीने योजिले आहे. (हे प्रयोगविचलन आहे. Neologism चेही उदाहरण आहे.) इथे नूपुरांच्या संदर्भात विराण म्हणजे निष्प्राण, चैतन्यरहित, नादरहित पैंजण! आता पैंजणातील अनुनाद, लयसंगीत सारे संपले! अशा संवेदनाशून्य पैंजणासारखे नभ झाले आहे. नभालाही उष्ण झळांनी व्यापून टाकणारी ही बोचरी दुपार! म्हणून अशा ग्रीष्ममाध्यान्ही नभही तीक्ष्ण झाले – तापद! हे चावा घेणारे नभ! एरवी आत्मीय नभ, आता तीक्ष्ण – केव्हाही अग्निदंश• करील असे झाले आहे.

अंगाची काहिली करणारा दाहक तेजाळ प्रकाश बघून कवीला वाटतं की जणूकाही तेजाचे तळेच फुटून तेजोमय प्रकाश चहूकडे सांडला आहे. पुढे कवी म्हणतात, एखाद्या विदग्ध प्रतिमेप्रमाणे तू 'सगुण ऊन', 'झेलूं नको.' 'सगुण' हे विशेषण लक्षणीय आहे. वेगवेगळ्या वेळांची उन्हे वेगवेगळे संदर्भ घेऊन येतात व मानवी मनात

---

• कवी भृंग यांच्या 'तप्त वाराणसी' या कवितेतील काही ओळी (भावसाधर्म्यामुळे) येथे देत आहे –

"भर वस्तीतही निर्जन रस्ता कापणारी दुपार!...
प्राणांना चिरडून टाकणारे सृष्टीचे अग्नितांडव!
पाणी दुर्लभ अन् अन्न स्वस्त;
जागविणारी रात्र अन् दिवस सुस्त!
अनंत अजस्र जिभांनी गिळून टाकणारी आग...
प्राणघातक अग्निदंश!"

अनुक्रमणिका






विविध संवेदना निर्माण करतात. हिवाळ्यातील सकाळच्या कोवळ्या उन्हाने आपल्या चित्तवृत्ती फुलतात. भिन्न वेळेच्या उन्हाचे भिन्न गुणधर्म आहेत. असे हे सगुण (स-गुण) ऊन!

शेवटी कवी हे दारुण दुःख 'तू एकटी साहू नकोस, तुझे अमल (= निर्मळ) दुःख तू मला जोगवा म्हणून दे', अशी मागणी करतात.

इथे ही कविता संपते. चपखल, यथार्थ शब्दयोजना, सानुरूप विशेषणांचा वापर, नेमक्या क्रियापदांचे योजन, नेमक्या शब्दांची निवड करतानाचा औचित्यविवेक, नवनवीन विशेषणांची पखरण या सर्व शैलीवैशिष्ट्यांनी ही कविता साकारलेली आहे, नटलेली आहे. यातून ग्रेसच्या पृथगात्म शैलीचे दर्शन घडते.

वर निर्देशित वेब्स्टर प्रणीत नवीनीकरणाच्या चारही प्रकारांतील नवशब्दांचे उपयोजन ग्रेस यांनी आपल्या अनेक कवितांतून केलेले आहे. दोन अपरिचित शब्द एकत्र करून, एक परिचित व दुसरा अपरिचित शब्द एकत्र आणून त्यांनी आपली कविता नटविली आहे. दोन परिचित शब्द एकत्र आणून अपरिचित शब्दयुग्म तयार करणे, हे Neologism चे आगळेच स्वरूप ग्रेस यांच्या अन्य कवितांतून दिसून येते. 'संध्याकाळच्या कविता' ह्या काव्यसंग्रहातील अशी निवडक उदाहरणे पुढीलप्रमाणे - (कंसातील नावे कवितांची आहेत.) ध्वनिबंध (मरण), ध्वनिबंधन (हळदीचे हात), दुःखसूर, हिमनगर, बर्फधूळ (भूक), मरणफूल (भूक), तमसमर्पण, तननिर्मळ, (वाराणसी), प्रलयबंध (सावली), कैवल्यपूर्ण (संभ्रम), प्रकाशगाथा (स्वप्न), अंधार-व्रत (आठवण), स्पर्शगांधार (चांदणे), भावसंमोहन (अंगाईपण) अंगव्याकुळ, दीर्घ-दुःखी, चंद्रदुःख (आर्दा), चंद्रशिल्प (स्मृतिगंध), ख्रिस्त-व्याकुळ, शिल्पउदास (प्रिस्ट), सांज-मठ, स्मरणयुग, दुःखसावली. (उर्मिलेच्या कविता १) प्राक्तगंध (ऊ. क. - २) व्योमव्याकुळ (बर्फाच्या कविता - १) शब्दभांगार, अर्थसगुण, बर्फ-उत्सव, बर्फ-शिल्प, (ब. क. - १) हिमकंपित (कांचा), अंधारबन (पांढरे हत्ती), चंद्र-उदयिनी (भगवंत), अर्थनिळे (इराणी), पंथविराम (इराणी..), अधरवीण (कलश), सतंद्र (दुपारचे ऊन), शिशिर-भिजली, मरण-मिटली, स्वप्नांध (नदीच्या काठी) प्रलय-भरला (भेट).

वरील नवनिर्मित शब्दांकडे पाहिले, तर दोन शब्द एकत्र आणून नावीन्यपूर्ण शब्दबंध तयार करण्यातील कवी ग्रेस यांचे प्रातिभकौशल्य दिसून येते. 'व्याकुळ' हा शब्द अंग, दुःख, ख्रिस्त, व्योम, घन या शब्दांना जोडून, त्यांतून अनुभूतीतील वैविध्य कवीने जाणवून दिले आहे. ह्या सर्व शब्दांचे नूतनत्व स्वतंत्रपणे व ते ज्या अन्य शब्दांच्या साहचर्याने येतात, त्यांसह सर्वस्वी अपरिचित व अभिनव संदर्भ व अज्ञातप्रतिमा निर्माण करतात. हे शब्द ग्रेसच्या पृथगात्म शैलीची निदर्शके आहेत. अशा शब्दांमुळे/शब्दबंधामुळे कवीच्या शैलीची चटकन ओळख पटते.

भाषेला नवनवी शब्दलेणी चढविण्यात ग्रेसचे अनुपम कौशल्य दिसून येते. गोविंदाग्रज व कुसुमाग्रज यांच्या नंतरच्या पिढीतील ग्रेस हे तिसरे 'शब्दप्रभू' आहेत, हे मान्य व्हावे! ह्या तीनही कवींच्या नावात 'ग्र' हे अक्षर येणे, हा योगायोग म्हणायचा!

आता ग्रेसच्या 'चंद्रमाधवीचे प्रदेश' या कविता-संग्रहातील 'आई-१' ह्या कवितेकडे वळू.

आई – १

ती गेली तेव्हा रिमझिम<br>
पाऊस निनादत होता<br>
मेघात मिसळली किरणे<br>
हा सूर्य सोडवित होता

तशि सांजहि अमुच्या दारी<br>
येऊन थबकली होती<br>
शब्दांत अर्थ उगवावा<br>
अर्थातून शब्द वगळता

ती आई होती म्हणुनी<br>
घनव्याकुळ मीही रडलो<br>
त्यावेळी वारा सावध<br>
पाचोळा उडवित होता

अंगणात गमले मजला<br>
संपले बालपण माझे<br>
खिडकीवर धुरकट तेव्हा

अनुक्रमणिका






कंदील एकटा होता

हे रक्त वाढतानाही
मज आता गहिवर नाही;
वस्त्रात द्रौपदीच्याही
तो कृष्ण नागडा होता

**रचनाबंध :-**

वीस ओळींची ही कविता आहे. प्रत्येक ओळीत चौदा मात्रा आहेत; या कवितेत, पाचअक्षरी शब्द ४, चारअक्षरी शब्द १३, तीन अक्षरी शब्द १९, दोनअक्षरी शब्द २३ व एकाक्षरी शब्द ५ आहेत. एकाक्षरी सर्वच शब्द सर्वनामे आहेत. ही सर्वनामे शैलीदृष्ट्या लक्षणीय आहेत. चारअक्षरी शब्द सहाव्या मात्रेवर (उदा. निनादत, मिसळली, थबकली, बालपण) येऊन त्यांनी आंतरिक समतोल साधला आहे. पण असे सर्व ओळींमध्ये होत नाही.

कवी ग्रेस यांना चार व पाच अक्षरी शब्दांचे वेड आहे. (उदा. "मंत्रासम गुणगुणतो हा। इथलाच जुना रहिवासी") पाचअक्षरी शब्द दोन भागांत विभागले जाऊन अंतर्गत लयीचे संतुलन साधतात. (उदा., घन-व्याकुळ, खिडकी-वर, वाढता नाही, व द्रौपदी-च्याही) त्यामुळे लयीचे सौंदर्य अबाधित राहते. कधी कधी कमी मात्रांत जास्त शब्द कोंबण्याच्या प्रयत्नात लयीत खंड पडतो.

**कवितेतील उपयोजित शैलीउपाय : उदाहरणे :**

**(१) शब्दविवेक – (Choice of Words) :-**

अ) नामे :- पाऊस, मेघांत, किरणे, सूर्य, सांजहि, दारी, शब्दांत, अर्थ, अर्थातून, शब्द, आई, वारा, पाचोळा, अंगणांत, बालपण, खिडकीवर, कंदील, रक्त, गहिवर, वस्त्रात, द्रौपदीच्याही, कृष्ण, = २२

ब) सर्वनामे – ती, हा, अमुच्या, ती, मीही, मजला, माझे, मज, तो = ९

क) क्रियापदे – गेली, निनादत होता, सोडवित होता, थबकली होती, उगवावा, वगळता होती, रडलो, उडवित होता, गमले, संपले, होता, वाढतानाही, नाही, होता, = १५

ड) विशेषणे – घनव्याकुळ, सावध, धुरकट, एकटा, हे, नागडा = ६

ई) कर्मणी भूतकालवाचक धातुसाधित विशेषणे – मिसळली (= मिसळलेली) = १

फ) क्रियाविशेषणे – तेव्हा, रिमझिम, तशि, त्यावेळी, तेव्हा, आता = ६

य) पूर्वकालवाचक धातुसाधित अव्यये – येऊन = १

र) उभयान्वयी अव्यये – म्हणुनी = १

**(२) नवनिर्मित शब्द –** घनव्याकुळ = १

**(३) आवृत्ती –** १) तेव्हा (ओळ – १), तेव्हा (ओळ – १५)
२) ती – (ओळ – १), ती (ओळ – ९)
३) होता – (ओळ – २), होता (ओळ – ४), होता (ओळ – १३), होता (ओळ – १७), होता (ओळ – २०), होती (ओळ ६ व ९) तेव्हा (ओळ १ व १५)

**(४) संदर्भोल्लेख/संदर्भविचलन -** ओळ - १९-२० (वस्त्रांत द्रौपदीच्याही .... होता.)

**(५) क्रमविर्यय –** (शब्दक्रमभंग) ओळ – १३ व १४, ओळ – १५ व १६, ओळ – १८ शैलीउपायानुसार वरील शब्दांच्या नोंदी पाहिल्यानंतर असे लक्षात येते की–

१) सामान्यत: कवींचा कल विशेषणांचा अधिक वापर करण्याकडे असतो. परंतु ह्या कवितेत ग्रेस यांनी नामे व क्रियापदे यांचा अधिक वापर केलेला आहे. त्या तुलनेत विशेषणे व क्रियाविशेषणे ह्यांचे उपयोजन कमी प्रमाणात आहे. बोल्टन म्हणते, "A mature great poet gains a fewer effects from adjectives and adverbs, and more from verbs." हे ह्या कवितेच्या संदर्भात पटते.

२) विशेषणे केवळ सहाच असली तरी त्यांतील पाच विशेषणे शैलीदृष्ट्या प्रभावी आहेत.

**शैलीविश्लेषण व मर्मग्रहण :**

'ती' या सर्वनामाने कवितेचा आरंभ होतो. 'ती गेली' ह्या आरंभीच्या दोन शब्दांतून कवी 'ती'च्या निधनाची दु:खद वार्ता वाचकांना देतात. या दोन शब्दांतून कवितेविषयीचे वाचकांचे औत्सुक्य वाढवतात. ह्या दोन

शब्दांतून शैलीय प्रभाव स्पष्ट जाणवतो. 'गेली' हे क्रियापद अर्थप्रसरशील आहे, हे सुज्ञ वाचकांना सांगायला नको.

पुढील ओळींमधून भोवतालचा परिसर (निसर्ग) किती समरस, तन्मयतद्रूप झालेला आहे, हे 'रिमझिम' पाऊस पडणे, सूर्यकिरणे मेघात मिसळणे, ती सोडविण्याचा सूर्याने प्रयत्न करणे, सांजही दाराशी येऊन थबकणे, वाऱ्याने सावध दक्षतेने हळूच, आवाज होऊ न देता पाचोळा उडविणे, या साऱ्या घटनांचा संबंध आईच्या मृत्यूमुळे पुत्राला झालेल्या दुःखाशी, त्याच्या भावस्थितीशी संलग्न आहे, हे प्रकर्षाने जाणवते. ह्या घटना निर्देशित करणारी क्रियापदे सूचक (बोलकी) व शैलीसंपन्न आहेत. 'ती गेली' तेव्हा सारा आसमंतच दुःखवेडा झाला, असे कवी सांगतात. अधुंद कुंद आसमंत, रिमझिमणारा पाऊस आणि कवीच्या नेत्रांतील अथांब अश्रू या दोन्ही स्थिती एकाच वेळी असणे, हे परिस्थितीचे कारुण्य अधिकच वाढविते. अभ्रधुंद वातावरण, पर्जन्यवृष्टी आणि नेत्रांतून आसवे गळणे या एकाच वेळी घडणाऱ्या घटनांचा संकोच (Assimilation विलीनीकरण) कवीने 'घनव्याकुळ' ह्या नवनिर्मित शब्दांत केलेला आहे. ग्रेस कवीच्या अद्भुत कल्पनाशक्तीची व शब्दविवेककौशल्याची प्रशंसा करावी तेवढी थोडीच. ('घन' शब्दाचे खाली दिलेले अर्थ व मेघ हा अर्थ प्रामुख्याने घेऊन 'घनव्याकुळ' शब्दाकडे जाणीवपूर्वक पाहिले, तर या शब्दाची अर्थवलये लक्षांत येतील.)

'घनव्याकुळ' मीही रडलो, ही ओळ अतिशय भावस्पर्शी आहे. आकाशातून मेघवृष्टी होत होती आणि इकडे पुत्र घनव्याकुळ होऊन रडत होता. वर मेघ पाझरत होते आणि खाली आसवे पाझरत होती. दोन समांतर अनुभव 'घनव्याकुळ' या शब्दांत कवीने गोठवले आहेत. हा कविप्रतिभानिर्मित शब्द आहे.

घनव्याकुळ ह्या शब्दाकडे वळू. हा जोडशब्द आहे. घन व व्याकुळ हे दोन शब्द एकत्र आणून बनविलेला ह्या दोन शब्दांचे कोशगत अर्थ असे आहेत :-

१) घन - भरीव, व्याप्त, गोठवलेला, गहन हे अर्थ व मेघ हाही अर्थ.

२) व्याकुळ – शोकव्याकुळ, भयभीत, किंकर्तव्यमूढ, गोंधळलेला.

वरील अर्थ पाहिले तर 'घनव्याकुळ' ह्या नवशब्दयोजनेत कवीचे औचित्यसौंदर्य दिसून येते, हे स्पष्ट होईल. 'घनव्याकुळ' या शब्दात कवीची नेमकी भावस्थिती अंकित झालेली आहे.

जी गेली ती आई होती! "ती आई होती म्हणुनी....." असे कवी लिहितात. 'म्हणुनी' हा शब्द महत्त्वाचा. या शब्दयोजनेने मातृवियोगाने पुत्राची झालेली शोकव्याकुळ, दुःखव्याप्त एकटेपणाच्या गहन शोकाने विचलित, विमनस्क स्थिती नेमकी 'घनव्याकुळ' शब्दाने टिपली आहे.

"त्यावेळी वारा सावध। पाचोळा उडवित होता।।"

ह्या ओळींमध्ये 'सावध' हे वाऱ्याचे विशेषण आहे. ('पाचोळा' ह्या शब्दाचे नव्हे!) असा सावध वारा पावसाने ओली झालेली जड पाने म्हणजे ओला पाचोळा कसा उडवीत असेल? याउलट, परिस्थितीचे कारुण्य लक्षात घेऊन तो सावध व सहृदय वारा पाचोळा उडवून त्याच्या होणाऱ्या सळसळ नादाने शोकगंभीर शांततेत रसविघ्न का आणील? 'पाचोळा उडवित होता' ही ओळ लिहिताना प्रासंगिक गांभीर्य लक्षात न घेतल्याने औचित्यभंग झालेला आहे. मातृवियोगाच्या घनव्याकुळ दुःखाने झालेली पुत्राची शोकाकुल मनःस्थिती आपल्या कृतीने मर्माहत होऊ नये, याची दक्षता तो वारा घेत होता व तो सावधपणे संथ, विलंबित लयीत वाहत जात जणूकाही पुत्राचे सांत्वन करीत होता.

"अंगणात गमले मजला .... कंदील एकटा होता"

शोकावेग काहीसा ओसरल्यावर पुत्र भानावर येताच तो अंगणात आला. अंगणातील बालपणाच्या आठवणी जाग्या झाल्या आणि त्याला आपले बालपण संपल्याची तीव्र जाणीव झाली. व्यक्ती कितीही वयस्क असली तरी, जोवर आई आहे तोवर त्याचे बालपण टिकून आहे, हा विश्वास त्या व्यक्तीला असतो. (सुरेश भट म्हणतात, "आई तुझ्यापुढे मी। आहे अजून तान्हा") आई आहे म्हणजे बालपणीच्या सर्व कोवळ्या आठवणी, अजून ताज्या आहेत. अंगणात टाकलेलं पहिलं पाऊल! ते दुडुदुडु धावणं-धडपडणं-पडणं! – हे सारं आई आहे तोवर ताज आहे. ती त्या सर्व घटनांची हृद्य साक्षीदार आहे. खरेतर साक्षीदार दोन– आई व अंगण! आई गेली नि अंगणातील बालपण संपल्याची दुःखद जाणीव








त्याला झाली. अंगण व बालपण हे शब्द एकत्र आणून भावगर्भता व अर्थपूर्णता आणली आहे. 'शब्दविवेक' हा शैलीउपाय हाताळण्यात कवी किती चोखंदळ व दक्ष आहेत (हे १-२ अपवाद सोडून), हे सुज्ञ वाचकांच्या लक्षात आले असेलच.

खिडकीवरचा धुरकट कंदील ! 'धुरकट' हे विशेषण अर्थ बहुल आहे. आई गेल्यापासून कंदिलाची काच पुसलीच गेली नाही ही वस्तुस्थिती कवितेत प्रत्यक्ष शब्दांनी न सांगताही सुज्ञ वाचकांना कळते. येथे अनुक्त शब्दांतून उक्त अभिप्राय व्यक्त करण्याचे कौशल्य कवीने दाखविले आहे. अंगणातील संपलेले बालपण आणि खिडकीवरचा धुरकट कंदील या दोन वस्तुस्थिती आईच्या मृत्यूचे कारुण्य भयावहतेने निर्देशित करतात. धुरकट ह्या शब्दयोजनेत अनुपम शैलीसौंदर्य प्रकट झालेले आहे. धुरकट कंदील आई गेल्याची दाहक जाणीव सतत करून देतो.

आई कंदिलाची काच रोज पुसत असे. जळलेली वात थोडी कापत असे. पण आता कंदिलावर काजळी जमली आहे. धुरकट कंदील व उदास, अचेतन अंगण। आईवाचून घर ओकंबोकं, भकास, क्रियाशून्य झालं. मुलाचं बालपण व घराचं घरपण संपलं. स्थितीचे करुण-गंभीर भेदक व भयावह चित्र रेखांकित करीत तो कंदील मात्र एकटा अंधारात उभा होता.

"हे रक्त वाढतानाही ..... तो कृष्ण नागडा होता"

घरात एवढे घडले तरीही व्यवहार चालूच राहतील. शरीरातील रक्त गोठवून टाकणाऱ्या घनव्याकुळ शोकातही शरीरातील रक्त वाढत राहील. स्वतःला स्वतःच धीर द्यायला हवा. आता मन स्थिर व निःसंग झाले. आता कसलाही गहिवर नाही. कुठेही गुंतून पडणे नाही. द्रौपदीला वस्त्रे पुरविणारा कृष्ण स्वतः मात्र निःसंग, निर्गुण, निराकार, विदेही होता. द्रौपदीला वस्त्रे पुरवूनही स्वतः नागडा होता. त्या कृष्णासारखं ताटस्थ्य व एकटेपणासाठी बळ मातृविना पुत्राला हवे आहे. ज्याला छप्परच नाही असे घर किंवा ज्याच्या तारा तुटल्या आहेत, असे तंतुवाद्य (तंबोरा- पहा सरस्वती शब्दकोश) या संदर्भात 'नागडा' असे विशेषण वापरतात. मातृवियोगाने जीवनाच्या सुरेल तारा तुटल्या व डोक्यावरचे छत्रच उडून गेले व पुत्र उघडानागडा पडला. हा भाव नागडा या शब्दातून सूचित केला गेला असावा. अन्यथा आई व पुत्राच्या भावसंबंधातील कवितेत अंतिम दोन ओळींचे औचित्य काय ? महाभारतातील संदर्भ आई व पुत्राच्या संबंधाशी जोडायचा झाल्यास पुढीलप्रमाणे स्पष्टीकरण मांडता येईल —

द्रौपदीवस्त्रहरणप्रसंगी द्रौपदीने कृष्णाचा धावा केला. कृष्णाने तिचे लज्जारक्षण केले खरे; पण कृष्ण कृतिसिद्ध होण्यापूर्वीच दुःशासनाने द्रौपदीच्या वस्त्राला हात घातलाच ! पाच पतिव्रता स्त्रियांत जिला स्थान आहे, अशा द्रौपदीच्या वस्त्राला दुःशासनाचा हस्तस्पर्श व्हावा, हा तिचा विनयभंगच नव्हे काय ? असे घडल्यानंतर श्रीकृष्णाने वस्त्रे पुरवावी ? ह्या प्रकाराने द्रौपदीच्या नजरेतून तो सर्वसाक्षी, सर्वव्यापी भगवान श्रीकृष्ण पूर्णपणे उतरला म्हणून द्रौपदीच्या वस्त्रांतही म्हणजे द्रौपदीला वस्त्रे पुरवूनही तो कृष्ण तिच्या नजरेत नागडाच ठरला.

(हा महाभारतातील दाखला 'संदर्भ विचलन' करून देऊन कवितेतील विषयाशी (म्हणजे आई व पुत्र या संदर्भात) संबंध जोडून पुढील स्पष्टीकरण असे –)

तद्वत, मातृवियोगाने पुत्राच्या अंगावरचे मायेचे वस्त्रच कायमचे गळून पडल्यामुळे पुत्र असहाय, निराधार, पांगळा व उघडानागडा पडला. द्रौपदीच्या नजरेतून उतरल्यामुळे नागडा पडलेला कृष्ण मजसारख्या सामान्यावर मायेचे वस्त्र कसे पांघरील ? ह्या विचाराने पुत्राच्या उद्विग्नतेत अधिकच भर पडली. तात्पर्य द्रौपदीच्या नजरेतून जसा कृष्ण उतरला तसा कवीच्याही नजरेतून कृष्ण उतरला. भगवान श्रीकृष्ण द्वापरयुगांत द्रौपदीची व कलियुगांत मातृविहीन पुत्राची लाज राखण्यात असमर्थ ठरला.

अखेरच्या दोन ओळींत 'संदर्भोल्लेख' हा शैलीउपाय आहे. महाभारतातील संदर्भ कवितेत आणून त्याचा कवीने पुत्राच्या शोकव्याकुळ मनःस्थितीशी संवाद साधून कारुण्याचा परमोत्कर्ष वाचकांच्या मनावर बिंबविण्यात कमालीचे शैलीय सौंदर्य प्रकट केलेले आहे. संदर्भोल्लेख काहीसा विचलित स्वरूपात आणला गेल्याने येथे संदर्भ-विचलन हाही शैलीउपाय साधला गेलेला आहे.

वरील दोन्ही कवितांची केलेली शैलीवैज्ञानिक समीक्षा येथे संपवितो. यावरून हे लक्षात येईल, की शैलीविज्ञानाने शोधलेल्या एकूण तेहतीस शैलीउपायांपैकी वरील दोन कवितांतून कवी ग्रेस ह्यांनी पाच शैलीउपायांचे उपयोजन







अनुक्रमणिका

केले आहे. त्याची चर्चा वर आली आहेच. त्यांपैकी शब्दविवेक (प्रामुख्याने विशेषणे, क्रियापदे, नामे व शब्दलोप), नवीनीकरण (नवनिर्मित शब्द) व संदर्भोल्लेख हे तीन शैलीउपाय हाताळण्यात कवीचे विशेष नैपुण्य दिसून येते. शब्दांवर त्यांची जबरदस्त पकड आहे. ते नित्य नव्या शब्दांच्या शोधात असतात.

येथे एक गोष्ट स्पष्ट करावीशी वाटते. शब्दोप्रभू कवी स्वतःच्या नवनिर्मित शब्दांच्या कधी इतके प्रेमात पडतात की, त्यांची शब्दांवरची पकड ढिली होऊ लागते. शब्द त्यांच्या हातून निसटतात व स्वैरपणे, बळजबरीने कवितेत घुसतात व दाटीवाटीने जागा मिळेल तिथे बसतात. कवीचे शब्दप्रेम आंधळे होऊ लागते. शब्द कवीवर कुरघोडी करू लागतात. अशा वेळी नावीन्याच्या हव्यासापोटी अनावश्यक शब्द कवितेत रसविघ्न उत्पन्न करतात. अशा नवशब्दांनी व विसंवादी नवप्रतिमांनी कवितेत दुर्बोधता येते. अनेकार्थक्षमता हा कवितेचा चांगला गुण आहे व संदिग्धता (Ambiguity) हा तर एक शैलीउपाय (Stylistic Device) आहे. पण कुठलाही अर्थ लागू न पडता व्यर्थता (Absurdity) आणणारा शब्दमोह हा शब्दडोह ठरतो व अशा शब्दडोहात कवी स्वतःच अडकतो व फसतो.

वाचकांचा निरोप घेण्यापूर्वी, कवी ग्रेस ह्यांच्या 'संध्याकाळच्या कविता' या संग्रहातील प्रास्ताविकासारख्या आरंभी दिलेल्या आठ ओळी येथे उद्‌धृत करतो.

"क्षितिज जसें दिसतें
तर्शी म्हणावीं गाणीं
देहावरची त्वचा आंधळी
छिलून घ्यावी कोणी

गाय जशी हंबरते
तसेच व्याकुळ व्हावे
बुडता बुडता सांजप्रवाही
अलगद भरून यावें."

☆☆☆



अनुक्रमणिका

# क्षितिजे भेदून अनंताकडे उसळला साहित्य-रत्नाकर!

प्राचार्य डॉ. अनिल सहस्रबुद्धे

प्राध्यापक हा केवळ एखादा विषय, आपल्या दैनंदिन अध्यापनातून, विद्यार्थ्यांपर्यंत पोचविणारा संदेशक नसतो; तो संज्ञापक असतो. किंबहुना तो संज्ञापक असावा, अशी शिक्षणक्षेत्राची आणि शिक्षणप्रक्रियेची अपेक्षा असते. संज्ञापक होण्यासाठी वाचन, चिंतन, शोधन, संशोधन, मांडणी, पुनर्मांडणी, चर्चा, विश्लेषण असा व्यासंग आणि संगात्मक दीर्घोद्योग करण्यात प्राध्यापकाला आपल्या प्रतिभेसह गढून जावे लागते. अलीकडे असे प्राध्यापक आहेत का? असतात का? असे प्रश्नही उपस्थित केले जात आहेत. व्यावहारिक दृष्टीने बोलायचे, तर प्रत्येक वेतन-आयोगाबरोबर, प्राध्यापकांना वेतन देताना वरील प्रश्नां-विषयी प्रचंड चर्चा होत असल्याचा अनुभव सातत्याने येत असतो. या सर्व चर्चेतील तज्ज्ञांची आणि सामान्यजनांची सर्वार्थे अपेक्षा पूर्ण करणारा वस्तुपाठ म्हणजे डॉ. र. बा. मंचरकर होत.

१. मंचरकरांच्या एकूण लेखनाची नोंद ठेवताना त्यांच्या सुविद्य कन्या डॉ. वैशाली भालसिंग म्हणतात– डॉ. र. बा. मंचरकर यांचा पहिला साहित्यमीमांसापर लेख 'अलंकार-संज्ञा, इतिहास आणि अर्थ' हा 'नवभारत' मार्च १९६८ या अंकात प्रसिद्ध झाला. तेव्हापासून आठ ग्रंथ, सहा सूत्रसंपादने, पाच संहितासंपादने, पाठ्यपुस्तके, प्रस्तावना, नियतकालिकांची संपादने, कोशांतर्गत टिपणे, ग्रंथांतर्गत लेखन, वाङ्मयीन आणि इतर नियतकालिकांतील लेखन, चर्चा-परिसंवादांतील निबंध व भाषणे अशा विविध माध्यमांतून, वेगवेगळ्या विषयांवर लिहिलेल्या तीनशे नोंदींची सूची देता येते. १९६८ पासून २०१२ पर्यंत डॉ. मंचरकर लेखन, व्याख्यान, चर्चा, संपादन, मार्गदर्शन या-ना त्या प्रकारे अध्यापन करीतच होते. साहित्यास्वाद, साहित्यसमीक्षा, साहित्यसंशोधन या क्षेत्रांतील त्यांचा संचार, वर्गांत, परिसंवादांत, व्याख्यानांत, चर्चेत आणि मार्गदर्शनात, मौखिक स्वरूपात सुरू होता; तसाच तो ग्रंथ, लेख, शोधनिबंध या स्वरूपात लेखनातूनही सुरू होता. सातान्यापासून श्रीरामपूर, अहमदनगरपर्यंतचा, अध्यापनसेवा या निमित्ताने त्यांचा प्रवास घडला असला, तरी पस्तीसशेवर व्याख्यानांच्या माध्यमातून त्यांचा प्रवास बृहन्महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेरही घडला आहे. श्रेष्ठ, व्याख्यात्मक व्याख्यान करणारा, भारदस्त आणि लयबद्ध शब्दलाघवातून सभेला दिपवून टाकणारा वक्ता म्हणून डॉ. शिवाजीराव भोसल्यांपासून अनेक ख्यातकीर्त वक्त्यांनी त्यांना वाखाणले आहे. साक्षेपी समीक्षक, संशोधक म्हणून डॉ. रा. चिं. ढेऱ्यांपासून अनेक अधिकारी व्यक्तींनी त्यांची गांभीर्याने दखल घेतली आहे. 'ग्रंथभेट' मिळाली, की त्यांना सर्वाधिक आनंद होत असे, हे मी स्वतः अनुभवले आहे. लेखन, वाचन, अध्यापनव्रती म्हणून त्यांचा परिचय महाराष्ट्रातील सर्व मराठी भाषा, साहित्य अभ्यासकांना आहे.

२. महाराष्ट्र सारस्वताच्या अमुक एका दालनाकडे, साहित्यप्रकाराकडे, साहित्यप्रवाहाकडे त्यांचे नकळतसुद्धा दुर्लक्ष झाले नाही.

मध्ययुगीन वाङ्मयातील संत आणि आख्यानकवी, एकोणिसाव्या शतकातील निबंधवाङ्मय, नवे वाङ्मयीन प्रवाह, भाषाविज्ञान, वाङ्मयाचा इतिहास, साहित्यसमीक्षा आणि संशोधन, संहिताचिकित्साशास्त्र, तौलनिक साहित्या-भ्यास, साहित्यिक भूगोल, अध्यापन अशा अनेकविध विषयांवर त्यांचे लेखन आहे. भाषेचा भारदस्तपणा, पारि-भाषिक भाषेचा यथोचित वापर, चिकित्सेतील ताटस्थ्य, विषयमांडणीतील मुद्देसूदपणा, प्रश्न उपस्थित करून उत्तरांची शोधक मांडणी करण्याची संवादी वृत्ती, शब्द, भाषा आणि अवतरणे यांची पांडित्यपूर्ण मांडणी अशी त्यांच्या लेखनाची वैशिष्ट्ये सांगता येतील. अलंकारप्राचुर्य आणि लयबद्धता, बहुधा संत आणि पंडितसाहित्याच्या प्रभावाने डॉ. मंचरकरांच्या लेखनात प्रवाहित झाली असावी. उदंड व्यासंगाचे प्रतिध्वनी त्यांच्या लेखनात आणि व्याख्यानांत सतत घुमत असल्याचे वाचक, श्रोत्यांनी अनुभवले आहे. प्रसंगोपात्त मोठ्या प्रमाणावर लेखन

केलेल्या या अभ्यासू समीक्षकाचे ग्रंथ मात्र संख्येने कमी आहेत. मात्र सर्वच ग्रंथांना संदर्भग्रंथ म्हणून मूल्य आहे. तसेच ते ग्रंथ मार्गदर्शकही ठरले आहेत.

३. ज्ञानेश्वरीच्या अध्यायांचे, विद्यार्थी, अभ्यासक यांना उपयुक्त ठरेल, असे ज्ञानदेवीचे लावण्यलक्षी विवेचक संपादन त्यांनी केले आहे. विस्तृत प्रस्तावनेद्वारे साहित्य आणि तत्त्वज्ञानचिकित्सा हे त्यांनी संपादिलेल्या पहिल्या, दुसऱ्या आणि सातव्या या तीनही अध्यायांचे वैशिष्ट्य सांगता येईल. ज्ञानदेवांच्या स्वानुभवातून त्यांच्या प्रज्ञाचक्षूंना दिसलेली तत्त्वज्ञानाची वैशिष्ट्ये, त्यांच्या नावीन्य व मौलिकतेसह डॉ. मंचरकरांनी अनेक लेखांतून प्रकट केली आहेत. 'संतसाहित्याच्या वाङ्मयीन अभ्यासाच्या दिशा' लिहून त्यांनी अभ्यासकांना मार्गदर्शन केले आहे. नामदेव, एकनाथ आणि ज्ञानदेव यांच्यासंबंधीचे भाष्यात्मक लेखन, एकनाथ आणि ज्ञानदेव यांचा पंडितांवर जाणवणारा प्रभाव, हे त्यांचे वैशिष्ट्यपूर्ण लेखन होय.

मुक्तेश्वरांची कविता - खंड १ (स्फुटकाव्ये), खंड २ – (रामायण), खंड ३ (महाभारत) हे त्यांचे प्रबंधात्मक लेखन ही पंडिती साहित्याच्या चिकित्सक अभ्यासाला मोठी देणगी आहे. 'एकनाथ आणि मुक्तेश्वर' असा तुलनात्मक विचारही त्यांनी स्वतंत्रपणे ग्रंथबद्ध केला आहे.

मध्ययुगीन धर्मसंप्रदाय आणि त्यांच्या आश्रयाने निर्माण झालेले साहित्य याचे साक्षेपी विवेचन त्यांनी 'धर्मसंप्रदाय आणि मध्ययुगीन मराठी वाङ्मय' या ग्रंथात केले आहे. प्रेरणा आणि तत्त्वज्ञान या दोहोंच्या योगाने निर्माण झालेल्या साहित्यातील निखळ आनंदप्रद साहित्य कोणते, यावर त्यांच्या चर्चेचा भर दिसतो. सांप्रदायिक वाद, तात्त्विक वाद, गुरुपरंपरा, काव्यकारणे, काव्य-निर्मितिप्रक्रिया या सर्वांवर भाष्य करताना आपण साहित्य-चिकित्सा करतो आहोत, याचे त्यांचे भान सुटत नाही. 'वीरशैव संप्रदाय (सूत्रसंपादने)', या लेखनातही याचा अनुभव येतो. 'एकनाथ परंपरा आणि प्रभाव' या लेखना-तही साहित्यिक चिकित्सेचाच त्यांचा दृष्टिकोण प्रकटतो.

'तौलनिक साहित्य आणि मध्ययुगीन मराठी वाङ्मय' असा विषय समग्रपणाने मांडताना तौलनिक साहित्य अभ्यास किंवा चिकित्सा संकल्पना स्वरूप आणि पूर्व-सूरीने केलेले प्रयत्न यांचा विचार करून, मध्ययुगीन मराठी वाङ्मयाच्या अभ्यासाचे स्वरूप कोणत्या पकारे प्रकटावे, याचे सोदाहरण मार्गदर्शन ते करतात.

मध्ययुगीन मराठी वाङ्मयातील संतांचे आणि संत-वाङ्मयाचे जनमानसातील स्थान लक्षात घेऊन संतांचे तत्त्वज्ञान आणि कार्य यांवर ते प्रवचनांच्या स्वरूपात भाष्यात्मक लेखन तर करतातच; तथापि अध्यात्म विषया-वर त्यांनी व्याख्यानेही दिली आहेत.

४. 'राजकीय तत्त्वप्रणाली – सिद्धांत आणि व्यवहार' (सूत्रसंपादन) स्वरूपातील ग्रंथ सिद्धान्तातील, मूलभूतता, तत्त्वविचार, व्यवहारातील उपयोजनाची अपेक्षा आणि प्रत्यक्ष राजकीय आणि सामाजिक व्यवहार यांवर ते तत्त्वविवेचक स्वरूपात भाष्य करतात. धर्मतत्त्वज्ञान आणि व्यवहार यांत जशी दरी जाणवते, तशीच दरी राजकीय तत्त्वप्रणाली आणि व्यवहार या बाबतीत पाहावयास मिळते, हे त्यांनी सप्रमाण स्पष्ट केले आहे.

'शिक्षण आणि समाज' यांचा अन्योन्य संबंध मार्मिकपणे व तत्त्वदर्शी पद्धतीने डॉ. मंचरकरांनी स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. समाजाची शिक्षणप्रक्रियेकडून असलेली व्यावहारिक, सामाजिक, तात्त्विक आणि मानसिक अपेक्षा स्पष्ट करून, शिक्षणप्रक्रिया आणि शिक्षणाचा समाजाभिमुख विचार त्यांनी विश्लेषित करण्याचा प्रयत्न केला आहे.

'वाङ्मयाचे महाविद्यालयीन अध्यापन' (सूत्रसंपादन) या ग्रंथात वाङ्मयअध्यापनाच्या संदर्भात त्यांनी प्रशिक्षकाची भूमिका स्वीकारून प्राध्यापकांना मार्गदर्शन केले आहे.

राजकीय, सामाजिक या संदर्भाने शिक्षणप्रक्रियेविषयी विचार करताना, ते लोकशिक्षकाची आणि शिक्षकांच्या मार्गदर्शकाची भूमिका बजावताना दिसतात.

५. 'गो. म. कुलकर्णी यांची समीक्षा' या ग्रंथात समीक्षेची समीक्षा करताना डॉ. मंचरकर एक प्रकारे समीक्षेचे शास्त्र मांडतात. गो. म. कुलकर्णी यांच्या समीक्षालेखनाचा दृष्टिकोण, वैचारिक व्यूह, द्विध्रुवात्मकतेची सांगड घालण्याची दृष्टी अशी वैशिष्ट्यलक्षी चर्चा करतात.

'भाषाशास्त्रविचार' हा मौलिक स्वरूपाचा ग्रंथ केवळ भाषाशास्त्राच्या पूर्वसूरींच्या सैद्धांतिक चर्चेच्या आधारे संपूर्ण शास्त्र मांडणी करणारा ग्रंथ नाही; तर या निमित्ताने

भाषाशास्त्राचा विचार कोणकोणत्या अंगांनी करावा लागतो व तो तसा का करावा लागतो, याचा विचार मांडत भाषाशास्त्राचे अर्थ आणि साहित्य या दोन्ही दृष्टींनी महत्त्व विशद करण्याचा प्रयत्न करणारा ग्रंथ आहे.

या महत्त्वाच्या ग्रंथाप्रमाणेच 'साहित्यिक भूगोल' या संकल्पनेवर लक्ष केंद्रित करून, त्यांनी साहित्यिकाच्या व्यक्तिमत्त्वघडणीत भौगोलिक पर्यावरणाचा केवढा मौलिक परिणाम असतो व तो साहित्यिकाच्या प्रेरणा, लेखनप्रवृत्ती आणि शैली व भाषा यांवर कशा प्रकारे प्रभाव टाकतो, याची सोदाहरण चर्चा करून; साहित्यसमीक्षेला 'स्थल-काळपरिस्थितीचे' आयाम असते, याकडे लक्ष वेधून; त्यातील भूगोल हा भाग कसा मूलभूतपणे केंद्रस्थानी असतो, याकडे लक्ष वेधले आहे. त्यांच्या मते, "परिसर-शीलता हा माणसाच्या अस्तित्वाचा धर्म आहे." काल आणि संबंधात येणारे मानवी परिवार साहित्यिकाच्या व्यक्तिमत्त्वावर आनुषंगिकपणे परिणाम करतात.

समीक्षेच्या प्रांतात 'तौलनिक साहित्याची सैद्धांतिक चर्चा', 'परकीय साहित्यप्रणालीस्वीकारातील तारतम्य', 'वाङ्मयप्रकार आणि लेखक', 'लोकशाहीकरण आणि नवे वाङ्मयप्रवाह', 'नवप्रवाहांचे श्रेय आणि मर्यादा', 'प्रवाहांतील साहित्यामधील कलात्मक जाणीव', 'नवनव्या समीक्षापद्धतींच्या संकल्पना आणि विनियोग', 'समीक्षेचे प्रकार, भूमिका आणि रीत' हे असे मुद्दे त्यांनी विस्तृतपणे चर्चेचे विषय करून मराठी समीक्षेत भर तर घातलीच, परंतु स्वतःचा दबदबा निर्माण केला.

६. रयत शिक्षण संस्थेच्या महाविद्यालयातून प्रपाठक म्हणून मराठी भाषा व वाङ्मय यांचे अडतीस वर्षे अध्यापन (१९६६–२००३) करीत, त्यांनी मराठी साहित्य-सागर ढवळून काढला. संशोधक मार्गदर्शक या नात्याने बारा विद्यार्थ्यांना पीएच. डी.साठी व सतरा विद्यार्थ्यांना एम्. फिल्.साठी त्यांचे मार्गदर्शन लाभले. मध्ययुगीन मराठी वाङ्मय, नवे साहित्यप्रवाह, साहित्यसंशोधन, साहित्यसमीक्षा, कथनमीमांसा, वाङ्मयेतिहास, साहित्यिक भूगोल, भाषाविज्ञान वाङ्मयाचे अध्यापन, राजकीय तत्त्व-प्रणाली, शिक्षण आणि समाज, तौलनिक साहित्य या अभ्यासक्षेत्रात नऊ ग्रंथ, चार सूत्रसंपादने, आठ संहिता-संपादने, आणि सव्वाचारशेवर शोधनिबंध या अभ्यासकाने वाङ्मयाभ्यास क्षेत्रात सादर केले. दोन राज्यपुरस्कार, तीन वेळा जीवनगौरव पुरस्कार आणि प्रतिष्ठित संस्थांच्या त्र्याहत्तर पुरस्कारांनी हे व्यासंगी व्यक्तिमत्त्व सन्मानित झाले. पुरस्कार किंवा सन्मान हे त्यांच्या साहित्यसेवा आणि अभ्यास या संदर्भात परिमाण होऊ शकणार नाही, हे खरे; परंतु 'सद्‌गुरूच्या नादे शिष्य बी घडला। शिष्य बी घडला सद्‌गुरुचि झाला।' या उक्तीप्रमाणे, साहित्य-सागरानादे डॉ. मंचरकर बी घडले आणि साहित्य 'रत्नाकर' झाले असे म्हटले, तर अतिशयोक्त होणार नाही.

७. समीक्षा आणि संशोधनाच्या मार्गाने 'साहित्य रत्नाकर' स्वरूपात प्रकटलेले हे व्यक्तिमत्त्व महाराष्ट्राच्या लक्षात राहते, ते त्यांच्या अमोघ वाणीमुळे. 'वक्ता दशसहस्रेषु' असे म्हणतात. त्याची प्रचीती डॉ. मंचरकरांचे व्याख्यान ऐकताना येई. ओघ, लयबद्ध वक्तव्य, व्यासंगाची वाणीतून सतत प्रत्ययास येणारी व्यापकता, आवाजातील धारदार गंभीरता आणि काव्यात्म संदर्भांची योजकता यांमुळे सभा मंत्रमुग्ध होई. व्याख्यान आणि अभिवाचन यांतील भिन्नता मावळल्याचा अनुभव येई. त्यांचे व्याख्यान हे प्रबंधनाचे नाट्यमय आणि पांडित्यप्रचुर आविष्करण असे. साहित्यिक, सामाजिक आणि आध्यात्मिक विषयांवर महाराष्ट्रात आणि बाहेर पाच हजारांहून अधिक व्याख्याने या वाचस्पतीने सादर केली आहेत.

८. डॉ. रत्नाकर मंचरकरांच्या लेखन, वाचन, चर्चा यांतील शक्तीची जरब महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांमध्ये, संशोधन अभ्यास केंद्रामध्ये होती. चिकित्सक व साक्षेपी अभ्यासक, संशोधक, समीक्षक या दृष्टीने मराठीच्या प्राध्यापकांमध्ये त्यांचा आदरयुक्त धाक होता. त्यांच्यातील शिस्तशीर आणि मार्गदर्शक प्राध्यापकाला सारेच नम्रतेने अभिवादन करीत. बोलताना आणि शिकविताना नेहमीच साधार विवेचन, स्पष्टीकरण, निवेदन, विश्लेषण करावे, हा त्यांचा शिरस्ता होता. पूर्वतयारीशिवाय आणि हातात संदर्भाची टिपणे ठेवल्याशिवाय ते कधीच विषयाची मांडणी करीत नसत. प्रकट वाचन, अभिवाचन आणि व्याख्यान यांत सूत्रबद्धता, नेटकेपणा आणि व्याख्यात्मकता राखूनच ते विषय मांडीत.

१९४३ साली अहमदनगर जिल्ह्याच्या पारनेर तालुक्यातील वडझिरे येथे प्रकटलेला हा 'साहित्य रत्नाकर'

११ फेब्रुवारी २०१२ रोजी क्षितिजे भेदून अनंताच्या प्रवासाला जाता झाला! शब्दब्रह्मवासी झाला! या साहित्य रत्नाकरा-मध्ये उमटलेल्या, लहरलेल्या, उसळलेल्या चिकित्सक समीक्षा संशोधनाच्या प्रभावलाटा मात्र त्यांच्या 'अक्षर' साहित्यातून, वाणी मुद्रिकांमधून, त्यांच्या संशोधक, समीक्षक, विद्यार्थ्यांकडून सतत पुन्हा पुन्हा अनुभवायला मिळतील, याची खात्री वाटते. एखाद्या संज्ञापकाची संजीवन-समाधी म्हणजे त्याचे ग्रंथ होय. डॉ. रत्नाकर बापूराव मंचरकर असे सतत अभ्यासकांना भेटत राहणारच आहेत.

☆☆☆

---

# जी. डी. पी.चा तोकडेपणा

श्री. सी. पं. खेर

जी. डी. पी. या अल्पाक्षराने इंग्रजी (व काही वेळा मराठीतूनही) लेखनात चर्चा चालत असल्याने हा लेख कोणत्या विषयाची चर्चा करणार आहे, हे समजावे म्हणून तो तसाच राखला आहे. जी. डी. पी. म्हणजे ग्रॉस डोमेस्टिक प्रॉडक्ट, स्थूल राष्ट्रीय उत्पादित. (स्थूराउ.) एखाद्या राष्ट्रांतर्गत बाजारासाठी उत्पादन केलेल्या वस्तूसेवांची मोजणी करिता येणारी समग्र संख्या. ही मोजणी कशी केली जाते, त्यात द्विरुक्ती कशी टाळली जाते, जिला भाव नाही, अशा वस्तूसेवांची गणना त्यात का व कशी केली जात नाही, याची संख्याशास्त्रीय चर्चा या लेखात आलेली नाही. आपल्या घरकामाचे, जीव तोडून सांभाळलेल्या नवरेशाहीच्या सेवेचे मूल्य त्यात वगळले जाते, या स्त्रीवर्गाच्या तक्रारीची दखलही इथे घेतलेली नाही. बालसंगोपन, एकंदर शिक्षण व आरोग्यसेवा जी किंमतीत मोजता येत नाही तिचाही जी. डी. पी.त समावेश असत नाही. थोडक्यात, जी. डी. पी.च्या आकड्यातून 'मानवाच्या संपन्नतेची वा दारिद्र्याची, त्यातील विविध स्तरांची स्थूलपणे जाणीव होते; पण त्याचे क्षेत्र (वेल् बीइंग) कळत नाही. पर्यावरणाचा नाश, वस्तुसेवांच्या गुणधर्मांत, नवनव्या तंत्रज्ञानामुळे, होणारे बदल जी. डी. पी.त टिपले जात नाहीत. यामुळे अस्वस्थ झालेल्या फ्रान्स प्रजासत्ताकाचे अध्यक्ष निकोलस सरकोझी यांनी जोसेफ स्टिगलिट्झ (अध्यक्ष), अमर्त्य सेन (सल्लागार) व ज्याँ पॉल फितुसी (Fitoussi) (समन्वयक) यांचा एक आयोग स्थापून मानवाचे क्षेम कसे जाणावे याचा अभ्यास करावा, असे सांगितले. (फेब्रुवारी २००८.) या आयोगाचा अहवाल 'आर्थिक संपादन व सामाजिक प्रगती यांचे मूल्यमापन' या नावाने नुकताच प्रसिद्ध झाला आहे. त्याचा यापुढे सारांशरूपाने ऊहापोह करण्याचा या लेखाचा प्रयत्न आहे.

## १.

**स्थूराउ :**

स्थू.रा.उ. हे बाजारी उत्पादनाची मोजणी करते. ही मोजणी बाजारात घडणाऱ्या वस्तू-सेवांच्या विनिमयाची किंवा बाजारात निविष्टे विकत घेऊन केलेल्या उत्पादनाची मोजणी होय. सगळ्या वस्तूंचे मूल्य पैशात व्यक्तविले जात असल्याने त्यांची बेरीज करणे शक्य होते. स्थूराउ सांख्यिकी जेवढी मोठी, तेवढी देशाची सुबत्ता चांगली असे मानले जाऊ लागले. पण लोकक्षेमाचा, कल्याणाचा जेव्हा खोलवर विचार होऊ लागला, तेव्हा त्यातला तोकडेपणा अर्थशास्त्रीय संशोधकांना जाणवू लागला.

मुळात स्थूराउच्या मोजणीत काही त्रुटी आढळून आल्या. एक, स्थूराउ सांख्यिकीत उत्पादनासाठी वापरलेल्या यंत्रादी भांडवलाच्या झीजतुटीसाठी तरतूद केलेली नव्हती. अशी तरतूद करून निव्वळ उत्पादिताचा विचार करणे योग्य ठरते. दोन, निव्वळ समग्र उत्पादनावरून व्यक्तींचे क्षेम व राहणीमान समजू शकत नाही. व्यक्ती बाजारात किती वस्तू, किती संख्येने खरेदी करू शकतात यावरून ते अजमावता येते. चालू प्राप्तीतून कर वगैरे वजा करून (उपभोगावर) विनियोग करता येण्याजोग्या–विनियोज्य प्राप्तीवरून ठरविता येऊ शकते. तीन, व्यक्तींस त्यांच्या संपत्तीपासून (वडिलार्जित, किंवा स्वतः केलेल्या गुंतवणुकीपासून) परतावा मिळत असतो. अशा परताव्याची, संपत्तीचे कटमितीने मूल्य काढून, चालू प्राप्तीत गणना करता येते/केली जाते.[१]

तेव्हा विनियोज्य प्राप्ती, संपत्तीपासूनचा परतावा व त्यातून वस्तुसेवांची खरेदी (उपभोगाचे प्रमाण) या तिन्हींचा एकत्रित विचार लोक-क्षेम अजमावताना करावा लागतो.

यातही एक अडचण येते. वस्तूंच्या खरेदीतील संख्येकडे लक्ष देताना, त्यांच्या गुणवत्तेचा विचार होत नाही. नवनव्या तंत्रज्ञानामुळे वस्तुसेवांची गुणवत्ता बदलू शकते.

अनुक्रमणिका

तसेच नवनव्या उपभोगात समाविष्ट होत असताना दिसतात. सेवेच स्वरूपही माहिती तंत्रज्ञानाच्या, दळणवळणाच्या उद्‌भवामुळे बदलत आले आहे. गुणवत्तेचे मूल्य कसे धरावयाचे, हा प्रश्न उरतोच.

'स्थूराउ'त बाजारात खरेदी केलेल्या वस्तुसेवांच्या मूल्याचा समावेश आहे. पण बाजारात खरेदी होत नसणाऱ्या *शिक्षण, आरोग्य, पर्यावरण अशा* व्यक्तींचे जीवनमान उंचावणाऱ्या सेवांची गणना कशी करावयाची, असा प्रश्न येतो.

ज्या वस्तुसेवा विनामूल्य पुरविल्या जातात (उदा. फी न घेता दिले जाणारे शिक्षण, आरोग्यसेवा) त्यावर (अंदाजित) किंमतींचे आरोपण करून त्यांची गणना व्यक्तींच्या समग्र प्राप्तीत किंवा विनियोगात केली जाते. व्यक्ती त्यासाठी प्रत्यक्षपणे काही खर्च करीत नाही.

स्टिगलिट्झ आयोगाने समग्र प्राप्ती आणि उपभोग यांची मोजणी करताना भावारोपण केल्या जात असणाऱ्या काही गोष्टी खालीलप्रमाणे नमूद केल्या आहेत –

१. स्वतःच्या राहत असलेल्या घराचे भाडे.
२. स्वतःच्या शेताचे, बागेचे, स्वतःसाठी राखलेले (कडबा, धान्य, दूध, फळे इ.) उत्पादन. स्वच्छता, स्वयंपाक, बालसंगोपन इ. यातून वगळण्यात आल्या आहेत.
३. बँकांच्या खातेदारास पुरविलेल्या काही (उदा., पास-बुकांतून हिशेब पुरविणे इ.) सेवा. बाजारात ठरणाऱ्या व्याजदरापेक्षा बँकांचा बचत खात्यावरील व्याजदर सहसा कमी असतो. बाजारी व्याजदर व प्रत्यक्षातला बचत खात्यावरील दर यांतील फरक बँका देत असलेल्या सेवेचे मूल्य म्हणून धरता येईल. पण या फरकाचे निगम (कंपन्या) व कुटुंबे यांतून विभाजन कसे करावयाचे, हा प्रश्न आहे.

   भावारोपण केलेल्या सेवांचे प्रमाण २००७ साली अमेरिकेचे २२.८ टक्के, (घरांची भाडी १०.१,वित्तीय सेवा ४.३, अन्य सामाजिक सेवा ८.४) फिनलंडचे ३६.८ टक्के (अनुक्रमे १२.२, २.३, २२.३ टक्के होते.)
४. लोक घेत असलेल्या विश्रांतीचे मूल्य. कामात उत्साह रहावा, यासाठी अशी विश्रांती हवीच.

विश्रांतीचे मूल्य काढण्याचा (अंदाज घेऊन देशा-देशांतील तुलना करण्याचा प्रयत्न झालेला दिसतो. तो असा :

कष्टकरी वयातील लोकांची संख्या गुणिले त्यांचा प्रतिदिनी विश्रांतीचा सरासरी काळ गुणिले सरासरी मजुरीचा दर.

सेवांचे, विश्रांतीचे भावारोपण केव्हाही अंदाजलेलेच असणार. त्यात निश्चितता येऊ शकत नाही. तसेच भांडवली मालाचे आयुष्य गृहीत धरले जात असल्याने (उदा., यंत्रसामग्री दहा टक्के, घरे २ ते ३ टक्के, वाहने वीस टक्के इ. याहूनही या वस्तू अधिक वर्षे टिकू शकतात.) निव्वळ राष्ट्रीय उत्पादिताचे मूल्यही ठामपणे मांडता येत नाही.

मोजणी करतानाच्या या अडचणी लक्षात घेतल्या, तरी दोन काळांतील व दोन देशांतील स्थूल राष्ट्रीय उत्पादित ही प्रगतीची वा पिछेहाटीची तुलना करणारी पहिली पायरी मानलेली आहे. पण 'स्थूराउ' सांख्यिकी लोकांचे जीवनमान कसे आहे, लोकांचे क्षेम कितपत आहे, हे सांगू शकत नाही. त्यासाठी स्टिगलिट्झ आयोगाने पुढील सूचना केलेल्या आहेत. त्या अशा :

१. 'स्थूराउ'मध्ये सांख्यिकीत आर्थिक व्यवहारांची, विशेषतः विक्रीय उत्पादनाची गणती येते. ती बऱ्याचदा लोकांचे क्षेम जाणण्याचे साधन म्हणून वापरली जाते. पण त्यामुळे दिशाभूल होऊ शकते व चुकीची धोरणे आखली जाऊ शकतात. लोकांचे जीवनमान जाणून घ्यावयाचे असेल, तर त्यांची वास्तव प्राप्ती व उपभोग (म्हणजे उपभोगावर होणारा विनियोग) जाणून घ्यावयास हवे. उत्पादन वाढत असले तरी झीजतूट, निर्यात, उत्पादन आणि उपभोग्य वस्तू यांच्या किंमतीतील फरक यांमुळे प्राप्तीत घट होऊ शकते. तेव्हा क्षेम कळवून घेण्यास उत्पादनापेक्षा प्राप्ती आणि उपभोग यांच्या प्रमाणाचा विचार केला जावा.
२. तसेच, याबरोबरच संपत्तीचाही विचार व्हावयास हवा. या संपत्तीत भौतिक, नैसर्गिक, सामाजिक तसेच मानवी भांडवलाचा – मत्तेचा व दायित्वाचा (असेट्स ॲंड लायबिलिटीज)– यांचा विचार

करावयास हवा. अशा संपत्तीमुळे प्राप्तीच्या – प्रमाणाचा व त्यातून उपभोगाच्या प्रमाणाचा टिकाऊपणा कळून येतो. संपत्तीच्या अभावामुळे प्राप्तीचा ओघ व राहणीमानाचा स्तर सतत टिकवून ठेवता येणार नाही.

३. 'स्थूराउ' सांख्यिकी देशातील समग्र वास्तव उत्पादन व्यक्त करते. पण व्यक्तींचे क्षेम जाणून घ्यावयाचे असेल, तर कुटुंबाची प्राप्ती व उपभोग जाणून घ्यावयास हवे. यामुळे सरकारला द्यावयाचे कर, कर्जासाठी द्यावयाचे व्याज व हप्ता यांची वजावट, सरकार कमी खर्चात किंवा विनामूल्य देत असलेली आरोग्यसेवा व शिक्षण यांतून मिळणाऱ्या अर्थ-साहाय्याची भर यांचा विचार करावयास हवा.

४. प्राप्ती, उपभोग आणि संपत्ती यांची सरासरी न बघता तिचे लोकसमूहातून विभाजन कसे झाले आहे, हे पाहावयास हवे. प्राप्तीचे मान कमी असेल पण संपत्तीचे मान चढ असेल, तर संपत्ती नसणाऱ्या व्यक्तीपेक्षा त्याचे राहणीचे मान उंचावलेले असू शकते.

५. ज्या सेवांना बाजारी मोल नाही, पण ज्या सुखावह आहेत, त्यांचा विचार व्हावयास हवा.

२.

**जीवनाची गुणाढ्यता :**

व्यक्ती/समाज चांगल्या तऱ्हेने जीवन व्यतीत करते/करतो आहे की नाही, हे पाहण्यासाठी 'स्थिराउ' सांख्यिकी- (प्राप्ती, उपभोग व संपत्ती) पलीकडे जावयास हवे. यासंबंधीच्या कल्पना व्यक्तिपरत्वे भिन्न असू शकतात, पण 'चांगल्या तऱ्हेने', क्षेमपूर्वक जगण्याचे काही निकष ठरविता येतात. (स्टिगलिट्झ आयोगानुसार) व्यक्ती चांगल्या प्रकारे जगते आहे की नाही, हे समजण्यासाठी पुढील गोष्टींचा एकसमयावच्छेदेकरून विचार करावयास हवा :

१. भौतिक राहणीचे मान (प्राप्ती, उपभोग व संपत्ती याने प्राप्त होणारा स्तर)
२. आरोग्य.
३. शिक्षण.
४. वैयक्तिक कामासकट क्रियाशीलता.
५. राजकारणात (धोरण ठरविण्यात) शासनात सहभाग.
६. सामाजिक संबंध.
७. पर्यावरणाची चालू व भावी स्थिती.
८. वैयक्तिक व आर्थिक असुरक्षितता.

**आरोग्य :**

उत्तम प्रकृती हे व्यक्तीचे आयुर्मान व जगण्यातील गुणाढ्यता (क्वॉलिटी) दर्शविते. प्राप्तीशी तिचा संबंध असतोच असे नाही. उदाहरणार्थ, अमेरिकेच्या मानाने फ्रान्सची प्रतिव्यक्ती प्राप्ती २००६ साली ०.८२ पट होती, तर पुरुषांचे जन्मतः अपेक्षिलेले आयुर्मान अमेरिके-पेक्षा १.०२५ पटीने अधिक होते.[२] तसेच जन्मतः अपेक्षिलेल्या आयुर्मानाचा आणि रोगटपणाचा, विशेषतः मनोरोगाचा संबंध दाखविता येत नाही. या बाबतींत बरेच मतभेद आढळतात.

कामाच्या स्वरूपाशीसुद्धा जन्मतः अपेक्षित आयु-र्मानाचा संबंध दाखविता आलेला नाही. उदाहरणार्थ, ब्रिटनमध्ये अकुशल कामगारापेक्षा कुशल कामगाराचे, श्रमाचे काम करणाऱ्यापेक्षा बिनश्रमाचे काम करणाऱ्यांचे, निम्नस्तरावरील ऑफिस कामगारापेक्षा वरच्या स्तरावरील कर्मचाऱ्यांचे जन्मतः अपेक्षिलेले आयुर्मान चढ असल्याचे आढळून आले आहे. तेव्हा प्रतिव्यक्ती प्राप्ती, व्यक्तीचा कामाचा स्तर यांवरून देशादेशातील जन्मतः अपेक्षित आयुर्मानाची व रोगटपणाची, तसेच जगण्यातील गुणवत्तेची तुलना जपूनच करायला हवी.

एवढे खरे, की उत्तम प्रकृती जीवन गुणाढ्यतेने जगण्यास साहाय्यभूत होते, यात शंका नाही.

**शिक्षण[३] :**

आजवर आर्थिक उत्पादनात कौशल्य आणि क्षमता वाढविण्याचे साधन म्हणून शिक्षणाचे महत्त्व जाणले गेले होते. पण उत्पादकता व क्षमता वाढविण्यापुरते ते मर्यादित नाही. व्यक्तींचा आत्मविश्वास, व्यंगावर मात करून जीवनाची गुणाढ्यता वाढविण्यात त्याचा महत्त्वाचा भाग आहे. आरोग्याचे महत्त्व जाणून घेण्यात, समाजात, राजकारणात सहभाग व स्थान मिळविण्यात त्याचे प्रमुख साहाय्य आहे.

स्त्रियांच्या बाबतीत शिक्षणाने आमूलाग्र बदल होऊ शकतो. स्वावलंबी होण्याकडे शिक्षणाने त्यांचा कल

अनुक्रमणिका

वाढतोच. शिवाय मुलांचे डोळसपणे संगोपन, त्यांच्या आरोग्याची काळजी व कुटुंबनियोजन करण्याकडे त्या अधिक प्रवृत्त होऊ शकतात.

शिक्षणाने सामाजिक जाणिवा तरल बनू शकतात.

**वैयक्तिक कामासकट क्रियाशीलता :**

जीवनाची गुणाढ्यता वाढविण्यात, सुखा-असुखाच्या कल्पना घडविण्यात व्यक्ती आपला वेळ कामात पैसा मिळविण्यात, खरेदीत, लेखन-वाचनात, संशोधनात, करमणुकीत, विश्रांतीत, प्रवासात इ. किती व कसा घालविते याचे महत्त्व आहे.

२००६ मध्ये, कोलंबस (आहियो, अमेरिका) व रेनेस (फ्रान्स) येथील पाहणीतील स्त्रियांनी आपला वेळ कसा घालविला व त्यातून सुख, असुख (ताणतणाव, क्लेश) किती मिळाले, याची पाहणी केली. यासाठी उठल्यापासून निजेपर्यंतच्या एकवीस कार्यांचा आढावा घेण्यात आला. त्यांतील वेतनासाठी काम, बिनवेतनाचे काम, कामासाठी जाण्यायेण्यात मोडलेला वेळ व विश्रांती-काळ अशा चार कार्यांबद्दल आयोगाने चर्चा केली.[४]

वेतन देणाऱ्या कामामुळे व्यक्तींची ओळखण (परिचय-आयडेंटिटी) होते व इतरांच्यात मिसळण्याची संधी मिळने. यामुळे अंशतः जीवनाची गुणाढ्यता वाढते. अर्थात सर्व तऱ्हेच्या कामातून जीवनात गुणाढ्यता मिळते, असे म्हणता येत नाही. या बाबतीत, "उचित" (डीसेन्ट) कामासंबंधात पाश्चात्त्यात पाहण्या केल्या गेल्यात. त्यात प्रमाणित नसलेले काम, लिंगभेदक रोजगार व मजुरी रोजगाराने ज्ञान व नैपुण्य मिळवून देणारी संधी, कामाचे तास, रात्रपाळ्या, कामातील अपघात, धोके इत्यादींची माहिती मिळविण्यात आली आहे. कामाचा व जीवनाचा तोल कसा साधला गेला, हेही जाणून घेतले आहे. गुणाढ्यतेच्या दृष्टीने ही माहिती उपयुक्त ठरावी.

वेतनाव्यतिरिक्त कामामुळे – मुलांचे पालनपोषण, बाजारहाट इ. – गुणाढ्यता वाढविण्यात साहाय्य मिळते.

कामाच्या ठिकाणी जाण्यात किती वेळ मोडतो, किती कष्ट पडतात (उदा., पुण्याहून रोज मुंबईस किंवा मुंबईच्या उपनगरांतून कामाच्या ठिकाणी जाण्यात करावी लागणारी धडपड) याचा परिणाम जीवनाच्या गुणाढ्यतेवर दिसून येतो. (अर्थात यातूनही मित्रपरिवाराच्या एकत्र येऊन बसण्याने, किंवा पुण्यामुंबईच्या प्रवासात गाडीतल्या स्त्रियांच्या काही समारंभांतून विरंगुळा मिळविण्याचा प्रयत्न केला जातो. पण त्यातून एकंदर गुणाढ्यता वाढते, असे म्हणता यावयाचे नाही.)

राहत्या घरांमुळे केवळ डोक्यावर छप्पर मिळते, का ते ऐसपैस, मुलांना शाळेला जायला जवळ आहे, याचाही विचार जीवनाच्या गुणाढ्यतेवर होतो. पण या-संबंधात आंतरराष्ट्रीय तुलना करण्याइतकी पाहणी केलेली आढळत नाही.

**राजकारणात व शासनात सहभाग :**

राजकारणात आवाज उठविता येणे, हे जीवनाच्या गुणाढ्यतेचे स्वाभाविक अंग आहे. नागरिक म्हणून ते त्याचे कर्तव्य आहे. धोरण ठरविण्यात, निर्भयपणे विरोधी मत मांडण्यात त्याचा सहभाग असला पाहिजे. हे सारे संविधानाचा जो ढाचा मानला गेला आहे, त्या ढाच्याच्या चौकटीनुसार व्हावयास हवे. जो या मान्य संविधानाचा, कायद्याचा आदर करतो, संयम व शिस्त पाळतो, तोच खरा नागरिक होय, असे म्हणता येईल. (याचा ज्यानेत्याने स्वतःपुरता व समाजापुरता विचार करावयाचा आहे.[५] सरधोपटपणा येथे उपयोगाचा नाही.)

**सामाजिक संबंध :**

समाजात (मित्रपरिवारात, समविचारी लोकांत) मिसळण्याने आनंद द्विगुणित होतो. एकलकोंडेपणाचा प्रकृतीवर निश्चित परिणाम होतो.

समाजात मिसळण्याने, ओळखीने रोजगार मिळ-विण्यास, सुरक्षेची भावना निर्माण होण्यास, आत्मभान, आदर, प्रतिष्ठा मिळविण्यास मदत होऊ शकते. चांगले संबंध हे नेहमीच प्रोत्साहक ठरतात. पण अशा संबंधांतून गट तयार होऊ शकतात. या गटांच्या स्पर्धा, मत्सर, द्वेष, मारामाऱ्या, खूनखराबी होण्यापर्यंत मजल जाऊ शकते.

जात, जातींचा समूह, जातीचे वेगळे नियम, व्यक्तींना जातीबाहेर वाळीत टाकणे, याचाही उद्भव झाल्याचे दिसून येते.

सामाजिक संबंधांमुळे होणाऱ्या नफातोट्याच्या पाहण्या पाश्चिमात्य जगात होऊ लागल्या आहेत. सामाजिक संबंधांना सामाजिक भांडवल असेही संबोधिले जाते.

अनुक्रमणिका

सामाजिक भांडवलाचे, भौतिक आणि आर्थिक भांडवलाचे, प्रगतीचे आणि जीवनाच्या गुणाढ्यतेचे संबंध कसे हितकर आहेत, हे अशा पाहण्यांतून संशोधिले जात आहे.

**पर्यावरणाचे परिणाम :**

लोकांच्या जीवनावर पर्यावरणाचा बरावाईट (अधिक करून प्रतिकूलच) परिणाम होत राहिला आहे. त्यांच्या प्रकृतीवर दूषित हवा, पाणी यांचा, कानठळ्या बसविणारे आवाज यांचा प्रत्यक्ष, तर बदलते हवामान, जैववैविध्यतेचा नाश, नैसर्गिक आपत्त्या यांचा अप्रत्यक्षपणे परिणाम होताना दिसतो. शक्य तेव्हा स्वच्छ हवा, पाणी, कमी वर्दळ, (वाहनांचा) कमी आवाज, असे राहण्याचे ठिकाण लोकांना पसंत असते. दुष्काळ आणि पूर येणारे ठिकाण त्यांना नको असते.

बदलत्या पर्यावरणाच्या परिणामांचा अभ्यास सतत चालू आहे. रोगराई, मृत्युसंख्या, जैव-वैविध्यतेत बदल, (कामगार) उत्पादकता इत्यादी निकष लावून त्यांची पाहणी-जोखणी करणे सुरू आहे. स्थल-कालानुसार त्यांच्या जीवनाच्या गुणाढ्यतेवर वेगवेगळे परिणाम होतात, इकडेही संशोधकांनी लक्ष दिलेले आहे.

**वैयक्तिक व आर्थिक असुरक्षितता :**

गुन्हेगारी (खून, मारामाऱ्या, दरोडे, चोऱ्या, दगडफेकीतून संपत्तीचा नाश, स्त्रियामुलींची छेडाछेडी, बलात्कार यांचे वाढते प्रमाण), अपघात, नैसर्गिक आपत्त्या, असुरक्षितता, विशेषतः त्याबद्दलची भीती जीवनाच्या गुणाढ्यतेवर, व्यक्तींच्या मोकळेपणाने वावरण्यावर निश्चित परिणाम करते.

बेकारी, उपासमार, निराधारी, रोजगाराची अनिश्चितता, संप, वेतनात घट इ. आर्थिक असुरक्षितता निर्माण करतात. बेकारभत्ता [अन्नसुरक्षा, किमान (शंभर दिवसांचा) रोजगार-योजना] संघटित मजुरांचा अरेरावीपणा कमी करणारी धोरणे (कंत्राटी कामगारांची नेमणूक), इत्यादी उपायांनी आर्थिक असुरक्षितता कमी करण्याचे प्रयत्न चालू आहेत. पण हे उपाय मलमपट्टीसारखे आहेत.

काही सरकारी धोरणामुळेही बेकारी आणणाऱ्या मंदीकडे अर्थव्यवस्था झुकत चालल्याचा अनुभव आपण घेत आहोत. अर्थव्यवस्थेत र्निनियंत्रण खुलेपणा असावा, सरकारी हस्तक्षेप मुळीच नसावा, या सैद्धांतिक ध्यासातून ही परिस्थिती निर्माण झाली आहे. सर्व क्षेत्रावर योग्य ते नियंत्रण, नियमन असणे जरूर आहे. (स्वतःच्या, बृहन्निगमांच्या हितासाठी) जागतिकीकरणाचा घोषा करणारे देश आता संरक्षक धोरणे (आयातीवर निर्बंध, परदेशातून कामे करून घेण्यावर मज्जाव इ.) अवलंबविण्याकडे झुकताना दिसत आहेत.

आजारपण आणि म्हातारपण यांच्या समस्या तीव्र होत चालल्या असल्याचे दिसून येत आहे. महाग होत चाललेले औषधोपचार एकतर व्यक्तींना कर्जबाजारी बनवतात किंवा कधी एकदा मरण येईल याची वाट पाहत बसायला लावतात. राहण्याच्या मर्यादित जागा, स्वभावामुळे वा नाइलाजाने करावा लागणारा खर्चाचा (मानसिक) भार, वृद्धाश्रमांचा अभाव किंवा कुटुंबाने झिडकारल्यामुळे येणारे उदासी एकलेपण, यामुळे जगण्याची गुणाढ्यता निश्चितपणे खालावते. आजारपणात योग्य तो उपचार करणे, त्यासाठी सरकारी मदत देणे (उदा., वृद्ध स्त्रियांना मिळणारी पेन्शन), वृद्धाश्रमात राहणाऱ्या आईवडिलांना वरचेवर भेटणे, कुणीतरी आपले आहे, असा त्यांना दिलासा देणे, हे यावरील उपाय ठरतील.

भावनिक आणि आर्थिक सहारा दिल्याने जीवनाची गुणाढ्यता वाढली नाही, तरी ती खालावणार नाही, असे पाहावयास हवे.

येथवरच्या विवेचनावरून हे ध्यानात येईल, की जीवनाची गुणाढ्यता जोखताना दोन प्रकारच्या घटकांचा विचार करावयास हवा. काही बाजारात विकत घ्यावयाचे घटक असून त्यांची पैशात मोजणी करता येते; तर काही घटकांना बाजारी मूल्य नसून, त्यांच्या महत्त्वानुसार त्यांना गुणांक द्यावे लागतात. पैशात मोजले जाणारे घटक स्थूल राष्ट्रीय उत्पादितात समाविष्ट होतात; तर पैशात मोजता न येणाऱ्या घटकांना गुणांक आरोपित करावे लागतात. या दोन्ही घटकांच्या स्वदेशातील व देशोदेशींच्या (एकाच मापाने जोखलेल्या – उदा., पैशात मोजलेले घटक क्रयशक्ती तुल्यतेने मोजणे) जीवनाच्या गुणाढ्यतेची तुलना करून गुणाढ्यता वाढविण्यासाठी कोणती धोरणे अवलंबावीत याचा अंदाज घेता येतो.

जीवनाच्या गुणाढ्यतेची देशांतर्गत व देशोदेशींची तुलना करण्यासाठी माहिती गोळा करताना सांख्यिकीय

संशोधकांनी काय करावयास हवे, याबद्दलच्या पाच शिफारशी स्टिगलिट्झ आयोगाने केल्या आहेत. त्या अशा :

१. जीवनाच्या गुणाढ्यतेबद्दल स्वतः व्यक्तींना काय वाटते, याची माहिती घ्यावयास हवी. व्यक्तींना स्वतःच्या जीवनाचे मूल्यमापन करता काय वाटते, त्यांचे अग्रक्रम काय आहेत, सुखाबद्दलच्या कल्पना व अनुभव काय आहेत, हे जाणून घेणारी प्रश्नावली सांख्यिकीय संशोधकांनी तयार करावी.

व्यक्तींना स्वतःचे क्षेम कसे वाटते; प्रसन्नता, आनंद, अभिमान अशा भावरूप तसेच मनःस्ताप व चिंता अशा अभावरूप भावनांबद्दल त्यांचे अनुभव कसे आहेत, हे जाणता येते असे संशोधनाने शक्य केले आहे. या (भावाभावरूप) भावना वेगवेगळ्या टिपावयास हव्या. या दृष्टीने प्रश्नावली तयार करावी.

२. जीवनाची गुणाढ्यता, आरोग्य, शिक्षण, व्यक्तींची दैनंदिन क्रियाशीलता (चांगले काम, राहायला घर यावर अवलंबून असणारी), समाजात वावर, राज-कारणात सहभाग, या वस्तुनिष्ठ घटकांवर अवलंबून आहे. यात सुधारणा कशी करता येईल, याचा विचार व्हावा.

३. जीवनाच्या गुणाढ्यतेत विषमता आढळते. तिचीही दखल घ्यावयास हवी.

४. जीवनाची गुणाढ्यता जोखणाऱ्या विविध घटकांतील दुवे जाणून घ्यावयास हवेत. त्यानुसार त्यातून सुधारणा करणारे धोरण अवलंबावे.

५. जीवनाच्या गुणाढ्यतेवर परिणाम करणाऱ्या घटकांची वेगवेगळी श्रेणी सांख्यिकीय संशोधकांनी तयार करावयास हवी.

३.

**टिकाऊ विकास व पर्यावरण :**

येथवरच्या विवेचनावरून हे स्पष्ट होईल, की मानवाचे क्षेम जाणून घेण्यासाठी आजवर पैशात मोजली जात असलेल्या 'स्थूराउ' सांख्यिकीचा विचार तर करायला हवाच; पण ती पहिली पायरी होय, हेही ध्यानात बाळगायला हवे. पण पैशात न मोजता येणाऱ्या, मानवाचे क्षेम जाणून घेण्यासाठी आवश्यक अशा बाबींना डावलून चालणारे नाही. 'स्थूराउ' सांख्यिकी व पैशात न मोजली जाणाऱ्या या बाबी यांचे एकत्रीकरण करावयाचे झाल्यास या बाबींचे पैशातले भाव ठरवावे लागतात. त्यावर भावा-रोपण करावे लागते. किंवा 'स्थूराउ' सांख्यिकी आणि अन्य क्षेमदायक बाबी याना गुणांक देऊन एकत्रितपणे जाणून घ्यावे लागते. यावरून क्षेम वाढते आहे का घटते आहे, याचा अंदाज घेता येतो व क्षेम टिकविण्यासाठी, घटू न देण्यासाठी, ते वाढविण्यासाठी कोणते उपाय योजले पाहिजेत, हे ठरविता येते.

हे चालू काळापुरते झाले. मानवाचे क्षेम येत्या, (पुढील) काळातही टिकायला हवे. तसेच ते पुढील पिढ्यांनाही मिळेल, असे आपण पाहायला हवे. स्टिगलिट्झ आयोगाने याचाही विचार मांडलेला आहे. पर्यावरण-संबंधाचा हा विचार आहे व तो अलगपणे मांडायला हवा, असे आयोगास वाटते.

पुढील पिढ्यांचे क्षेम आपण त्यांच्यासाठी कोणती व किती साधनसंपत्ती मागे राखून ठेवतो, यावर अवलंबून राहील. या साधनसंपत्तीचे दोन प्रकार आहेत. एक, निष्कासित होणारी (एक्स्झॉस्टिबल), व दोन, नवीकरण (रिन्युवेबल) करता येणारी. निष्कासित होणाऱ्या संपत्तीचा साठा, तसेच नवीकरण करता येणाऱ्या संपत्तीचा दर्जा व संख्या आपण पुढील पिढ्यांसाठी किती प्रमाणाने राखून ठेवतो, यावर पुढील पिढ्यांचे क्षेम अवलंबून राहील. म्हणजे नैसर्गिक भांडवल (खनिजे, जंगले, औषधी वनस्पती, शुद्ध मोकळी हवा इ.), मानवी भांडवल आपण किती निर्माण करतो किंवा नष्ट करतो, यावर पुढील पिढ्यांचे क्षेम अवलंबून राहील. याउलट, प्रश्न असा येतो, की आहे त्यातून, आपल्या वाट्यापेक्षा आपण फाजील प्रमाणात उपभोग घेत आहो का? हे तुलनात्मक-तेनेच जाणून घ्यावे लागेल व त्यासाठी या भांडवलांना संख्यात्मक वा गुण देण्याचा प्रयत्न करावा लागेल.

अशा रीतीने मोजणी (वा जोखणी) करण्याचे चार तऱ्हेचे प्रयत्न झाल्याचे (वाङ्मयातून) आढळून येते. थोडक्यात ते पुढीलप्रमाणे मांडता येईल. १. व्यापक व निवडक-उत्तम उपकरणफलक (इक्लेक्टिक डॅशबोर्ड). (जशा तऱ्हेचे वेग, टाकीत शिल्लक पेट्रोल इ. दाखविणारे मोटारीत असतात तसे), २. संयुक्त सूचकांक, ३. स्थूराउ



अनुक्रमणिका

(किंमतीत मोजता येणारे) सूचकांकातून क्षेम न पुरविणाऱ्या घटकांची (उदा., कामास जाताना व परतताना करावा लागणारा प्रवास) वर्जन आणि क्षेम देणाऱ्या, वाढविणाऱ्या घटकांचे (उदा., विश्रांती) अर्जन करून, समायोजित सूचकांक, ४. साधनसंपत्ती आपण (सध्या) फाजील प्रमाणात वापरतो की काय, हे दाखविणारे सूचकांक. या सगळ्याचे विश्लेषण इथे करावयाचे नाही.

मोजणीच्या एका पद्धतीत साधनसंपत्ती – नैसर्गिक भांडवल व भौतिक भांडवल – आपण फाजील प्रमाणाने वापरतो का, याबद्दलचे गणित (दशमान पद्धत) मांडण्याचा संख्याशास्त्रज्ञांचा प्रयत्न चालू आहे. यात निव्वळ बचतीत समायोजन करून एक अंक काढला जात आहे.

साधनसंपत्तीचा फाजील (आवश्यकतेहून अधिक, पुढील काळासाठी किंवा पुढील पिढीसाठी, साधनसंपत्ती टिकवून ठेवण्याचा विचार न करता, ओरबाडून खाण्याचा) वापर होत आहे का, हे पाहण्यासाठी अनेक निर्देशक एकत्र केले जात आहेत. त्यांतील दोनांचा इथे उल्लेख करतो. एक, समयोजित निव्वळ बचत; दोन, परिस्थिति-वैज्ञानिक (इकॉलॉजिकल) पदचिन्हे.

समायोजित निव्वळ बचत (किंवा अस्सल बचत किंवा अस्सल गुंतवणूक) ही संज्ञा 'हरित राष्ट्रीय हिशेबा-वर' आधारलेली आहे. एकूण सर्वतऱ्हेची संपत्ती – प्राकृतिक (भौतिक) भांडवल, राष्ट्रीय हिशेबात येणारे उत्पादक भांडवल, मानवी भांडवल यांत होणाऱ्या बदलाची (वाढ वा घट) दखल यात घेतली जाते. निदान आपल्याला सुखसोयी, क्षेम उपलब्ध आहे, तितके आपल्या पुढील पिढ्यांना उपलब्ध व्हावे, असा विचार यात अनुस्यूत आहे.

नेहमीच्या राष्ट्रीय हिशेबातील स्थूलबचतीतून १. भांडवलाच्या झीजतुटीसाठी वजावट करून, २. शिक्षणावर झालेला खर्च (जो खर्च म्हणून दाखविलेला होता तो) परत जमा करून, ३. नैसर्गिक साधनसंपत्तीचा वापर केल्याने होणारी अंदाजित घट (खनिज द्रव्यांचा उपसा) वजा करून, ४. उत्सर्ग वायूने होणाऱ्या प्रदूषणा-साठी अंदाजित मूल्यांची वजावट करून निव्वळ बचतीची अजमावणी केली जात आहे.

निव्वळ बचतीचा हा ढोबळ अंदाज आहे, हे उघड आहे. यासाठी कोणत्या बाबींची गणना केली जाते व त्यांच्या किंमती कशा तऱ्हेने ठरविल्या जातात, यावर हे अवलंबून आहे. तसेच पर्यावरणाच्या नाशासाठी केवळ उत्सर्ग वायूचा विचार तेवढा केला जात आहे. भूगर्भातील पाण्याचा नाश, माशांचा नाश, जमिनीची धूप व मातीच्या कसाची अवनती इत्यादींचा विचार बाजूला पडलेला आहे.

परिस्थितिवैज्ञानिक 'पदचिन्हे' या संकल्पनेत साधन-संपत्तीतील चालू उपभोगाचा पर्यावरणावर कसा व कितपत परिणाम होत आहे, त्यात कशी घस होत आहे याचा विचार होत आहे. यात नैसर्गिक भांडवलावर विशेष भर दिला जात आहे. जीवावरणाच्या (बायोस्फियर) पुनर्जनक (रीजनरेटिव्ह) क्षमतेचा यात विचार येतो. चालू लोकसंख्येच्या उपभोगाच्या प्रमाणाचा चालू स्तर पाहता जैविक दृष्ट्या उत्पादक भूमी व पाण्याचे क्षेत्र यांची यात मोजणी होते. आपण उपभोग घेत असलेले अन्न, तंतू, लाकूड उत्पादण्यासाठी केवढे क्षेत्र लागते, त्यातून निर्माण होणाऱ्या कचऱ्याचा आपण कितपत वापर करतो, आधारभूत संरचनेसाठी केवढी जागा लागते, व त्यासाठी लागणारी जैवावरणाची पुनर्जनक क्षमता तसेच त्यातून निर्माण होणारा मानवास हवा असणारा जैव साधनसंपत्तीचा प्रवाह कितपत आहे, याचा या संकल्पनेत विचार येतो.

'परिस्थितिवैज्ञानिक पदचिन्हांच्या' पाहणीचे निष्कर्ष धक्कादायक आहेत. २००३ च्या अंदाजानुसार उपलब्ध पदचिन्हांच्या क्षमतेच्या प्रमाणाहून २५ टक्के अधिक प्रमाणाने मानवाने उपभोग घेतला. एकंदरीने प्रतिव्यक्तीस १.८ ग्लोबल हेक्टर्स उपलब्ध असता युरोपियनांनी प्रति-व्यक्ती ४.९ ग्लोबल हेक्टर्सचा वापर केला, तर अमेरि-कनांनी प्रतिव्यक्ती ३.६ ग्लोबल हेक्टर्सचा वापर केला.[६]

उपलब्ध साधनसंपत्ती चालू पिढीने ओरबाडून खाऊ नये व तिचा पुढील पिढ्यांनाही उपयोग होईल अशा रीतीने बचाव कसा करता येईल, याबद्दलचे आजवर जे विचार मांडले गेले आहेत, त्या प्रत्येकात काही ना काही सैद्धांतिक त्रुटी राहिलेल्या आहेत. त्यातून या बाबी एका अंकात मांडण्याचा प्रयत्न आजवर यशस्वी झालेला नाही, असे आयोगाने दाखवून दिलेले आहे.

तेव्हा साधनसंपत्तीच्या टिकाऊपणाचा विचार करताना कोणत्या बाबींची दखल घेतली पाहिजे हे नमूद करून ठेवावे, इतपत या विचारांची प्रगती झालेली आहे. अशा तऱ्हेचे दोन अहवाल सध्या उपलब्ध आहेत. १. २००८ सालचा ओईसीडी/ युरोस्टाट/यूएन्इसीईचा अहवाल व २. २००९ सालचा फ्रेंच इकॉनॉमिक, सोशल व एन्व्हायरनमेंट कौन्सिल अहवाल. हे अहवाल स्टिगलिट्झ आयोगाच्या बऱ्याच मुद्द्यांशी मिळतेजुळते आहेत. २००८ चा अहवाल टिकाऊपणाच्या दृष्टीने (सर्वप्रकारच्या – नैसर्गिक प्राकृतिक, उत्पादक, मानवी भांडवलाच्या – संपत्तीच्या) 'साठ्यावर' (केवळ प्रवाह नव्हे) भर देतो व स्टिगलिट्झ आयोग त्याच्याशी सहमत आहे. या अहवालाने 'अर्थाधारित क्षेम' (बायोप्रॉडक्टिव्ह) (पैशात मोजता येणाऱ्या बाबी) ठरविणाऱ्या बाबी व पायाभूत क्षेम ठरविणाऱ्या बाबी असा भेद दाखविलेला आहे. यात मुख्यत: पृथ्वीचे वाढणारे तपन, पर्यावरणाचे प्रदूषण, स्वच्छ पाणी, जैविक वैविध्यता यांचा समावेश केलेला आहे. हे सोबतच्या तक्त्यात नमूद केलेले आहे.

या सर्वांत सध्या चर्चेत उत्सर्ग वायूच्या परिणामावर भर दिला जात असल्याचे दिसते. हवामानतज्ज्ञांच्या मते, औद्योगिकीरणापूर्वीच्या हवामानात २० अंश सेल्सिअसहून अधिक वाढीने उद्भवणारी जोखीम चारांत एकपर्यंत मर्यादित राखली, तर उत्सर्ग वायूची वरची मर्यादा ०.७५ दहालाखाचे दहालाख टन उत्सर्ग वायू तयार होतो. हे टोक जर गाठले गेले, तर न थोपविता येणारा ज्वालाग्राही, वायुमय हायड्रोकार्बन तयार होतो. या गणितानुसार आताच २००८ सालात अंदाजे ०.५ दहालाखाचे दहालाख टन वायूचे उत्सर्जन होत आहे. उष्णकटिबंधातील जंगलांचा नाश, महासागराच्या वाढत्या तपनामुळे होणारे वायूंचे उत्सर्जन ही याची कारणे आहेत.[७] अशा गणितातून शुद्ध वायूचा साठा किती उरला, हे अजमावता येऊ शकते. अशा तऱ्हेच्या गणिताचा इतर प्रकारच्या निष्कासित होणाऱ्या (एक्झॉस्टिबल) बाबींच्या बाबतीत विचार व्हायला हवा.

**टिकाऊपणाची मोजणी करण्यासाठी ओईसीडी/ यूरोस्टाट/यूनइसीईच्या कार्यकारी गटाने सुचविलेल्या निर्देशक बाबी.**

| निर्देशक बाबी | साठ्याचे निर्देशक | प्रवाहाचे निर्देशक |
|---|---|---|
| पायाभूत क्षेम | आयुर्मानाशी समयोजित आरोग्य. | आयुर्मानाशी निगडित रोगटपणा व मृत्युसंख्येत बदल दाखविणारा सूचकांक. |
| | माध्यमिक शिक्षणोत्तर शिक्षण घेतलेल्या लोकसंख्येचे प्रमाण. | माध्यमिक शिक्षणोत्तर शिक्षणाची नावनोंदणी. |
| | सामान्य तापमानापासून तापमानाचे विचलन. | हरित वनस्पतींपासून वायू-उत्सर्जन. |
| | भूपातळीवरील ओझोन आणि विविक्त (पार्टिक्यूलेट) सूक्ष्म संकेद्रीकरण. | सधूप धुके निर्मिणारे प्रदूषणयुक्त उत्सर्जन. |
| | स्वच्छ पाण्याची उपलब्धता. स्वाभाविक अधिवासाचे विखंडन. | पोषक द्रव्यांची ग्रहणता. स्वाभाविक आधिवासाचा अन्य उपयोगासाठी वापर. |
| अर्थाधारित क्षेम | प्रतिव्यक्ती वास्तव निव्वळ परदेशी मत्तेचे धारण. | प्रतिव्यक्ती परदेशी वित्तीय मत्तेत वास्तव गुंतवणूक. |
| | प्रतिव्यक्ती वास्तव भांडवलाचे उत्पादन. | उत्पादित भांडवलात प्रतिव्यक्ती |

| निर्देशक बाबी | साठ्याचे निर्देशक | प्रवाहाचे निर्देशक |
|---|---|---|
| | | वास्तव निव्वळ गुंतवणूक. |
| | प्रतिव्यक्ती वास्तव मानवी भांडवल. | प्रतिव्यक्ती वास्तव मानवी भांडवलात गुंतवणूक. |
| | प्रतिव्यक्ती वास्तव नैसर्गिक भांडवल. | नैसर्गिक भांडवलात प्रतिव्यक्ती वास्तव निव्वळ घस. |
| | ऊर्जेसाठीचा साधन-संपत्तीचा साठा. खनिज द्रव्यांचा साठा. | ऊर्जेसाठीच्या साधन-संपत्तीत घट. खनिज द्रव्यांची घट. |
| | लाकूड साधन-संपत्तीचा साठा. सागरी संपत्तीचा साठा. | या साठ्यात घट. या साठ्यात घट. |

**स्रोत :** स्टिगलिट्झ आयोगाच्या सारांशकृत अहवालात पृ. ५९ येथे उद्धृत.

अशासारखा जागतिक तपनाचा निर्देशक म्हणून दक्षिण ध्रुवाकडील कमी होत चाललेल्या बर्फाच्छादित प्रदेशाचा उल्लेख केला जात आहे. याला सागरी pHअसे संबोधिले जाते. सागरी pHचे प्रमाण उत्सर्ग वायू नैसर्गिक-रीत्या सागरात पंप होत असल्याने वाढत आहे. परिणामी उत्सर्ग वायू ग्रहण करणाऱ्या जंगलासारखी (सागरी) वनस्पतीही कमी होत आहे.

जैविक वैविध्यतेसंबंधात टीइबी हा गट संशोधन करीत आहे. हा गट (पर्यावरण व जैविक वैविध्यतेचे अर्थशास्त्र याचा अभ्यास करणारा) युरोपियन संघाने स्थापिला आहे. याचा अहवाल, तज्ज्ञांचे एकमत न झाल्याने बाहेर आलेला नाही.

आजच्या व उद्याच्या जनतेचे क्षेम कसे टिकविता येईल व त्यासाठी पैशात न मोजता येणाऱ्या बाबींचा विचार व्हावा, त्यात कोणत्या अडचणी, त्रुटी आहेत, याचे दिग्दर्शन स्टिगलिट्झ आयोगाने केले आहे. या आयोगाच्या अहवालाचा मुळातून अभ्यास करणे अपरिहार्य आहे.

**तळटीपा :**

१. समजा, संपत्तीचे मूल्य १०० आहे व ती वीस वर्षे टिकेल असे गृहीत धरले तर तिचे ढोबळपणे १/२० मूल्य चालू प्राप्तीत धरता येते.
२. आयोगाचा अहवाल, पृ. ४५ येथील तळटीप.
३. शिक्षण ज्ञान मिळविण्यासाठी, परिक्षार्थी (पदवी मिळविण्यापुरते) का जीवनशिक्षण असावे, का उत्पादनात साहाय्य करणारे औद्योगिक शिक्षण असावे या उद्दिष्टांच्या गोंधळात भारतात शिक्षणाकडे पूर्ण दुर्लक्ष झाले आहे. शाळेच्या वर्गांना चांगले छप्पर, बसायला बाके, स्वच्छतागृहांची सोय, शिक्षकांची संख्या व दर्जा इत्यादी सुविधा पुरविण्या-कडे फारसे लक्ष दिले गेले नाही/जात नाही, असे अनुभवास येत आहे.
४. आयोगाचा अहवाल, पृ. ४८-४९.
५. एवढे खरे, की गोंधळ आणि हुल्लडबाजी यांना लोकशाहीत स्थान नाही. हे केवळ वैफल्याचे प्रदर्शन होय. पराभव मान्य करण्यासही मोठे मन लागते. व खऱ्या नागरिकाचे ते लक्षण मानता येईल.
६. एक ग्लोबल हेक्टर म्हणजे ११.२ अब्ज जैवोत्पादक (बायोप्रॉडक्टिव्ह) हेक्टसेची सरासरी उत्पादकता. (आयोगाचा सारांशकृत अहवाल, पृ. ७०).
७. पाश्चिमात्य प्रगत देशांनी औद्योगिकीरण झपाट्याने केल्याने उत्सर्ग वायूचे प्रमाण वाढले आहे. औद्योगिकीकरण केल्याने शुद्ध वायूची घट होत असल्याने अप्रगत राष्ट्रांच्या औद्योगिकीकरणावर मर्यादा घालण्याच्या प्रयत्नात पाश्चात्त्य राष्ट्रे आहेत. तुमच्या-इतके आमचेही औद्योगिकीकरण होऊ दे, या अप्रगत देशांच्या विचाराला त्यांचा विरोध आहे.

**संदर्भ :**


❖ Report by the Commission on the Measurement of Economic Performance and Social Progress. - Prof. J. E. Stiglitz, Professor Amartya Sen, Prof. Jean Paul Fitousssi.







❖ The Rise and Fall of the G.D.P. (May 16, 2010), Jon Gertner.

☆☆☆

---

**Form IV**

रूल नं. ८ रजिस्ट्रेशन ऑफ न्यूजपेपर्स सेंट्रल रूल्स १९५६ अन्वये प्रकाशित

| | | |
|---|---|---|
| **प्रकाशक** | : | प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |
| **प्रकाशन दिनांक** | : | दरमहा १० तारीख |
| **मुद्रक** | : | घनश्याम वासुदेव जोशी, व्यवस्थापक, नवभारत मासिक |
| **राष्ट्रीयत्व** | : | भारतीय |
| **पत्ता** | : | द्वारा-प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |
| **प्रकाशक** | : | यशवंत शंकर कळमकर, चिटणीस, प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई |
| **राष्ट्रीयत्व** | : | भारतीय |
| **पत्ता** | : | द्वारा - प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |
| **संपादक** | : | श्रीकृष्ण माधव भावे |
| **राष्ट्रीयत्व** | : | भारतीय |
| **पत्ता** | : | ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रस्ता, पुणे - ४११ ००४. |
| **मालक** | : | प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५, गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |
| **मुद्रणस्थळ** | : | सन प्रिंटर्स, शॉप नं. ३५/३६, दाणेबाजार, स्टेट बँकेच्या शेजारी, गणपती आळी, वाई जि. सातारा ४१२ ८०३. |

मी यशवंत शंकर कळमकर जाहीर करतो की, वर दिलेली माहिती माझ्या माहितीप्रमाणे व समजुतीप्रमाणे संपूर्णतः खरी आहे.

**यशवंत कळमकर**

प्रकाशक

# छोट्या राज्यनिर्मितीचे वाढते बहुआयामी पेच

प्रा. माधव चोले

विशेषतः स्वातंत्र्योत्तर काळात मोठ्या राज्यातून छोट्या राज्यांच्या मागण्या कमी-अधिक प्रमाणात, गेल्या अनेक वर्षांपासून चळवळीच्या माध्यमातून, हिंसात्मक आंदोलनाच्या माध्यमातून येताना दिसतात. त्या भाषिक अलगता, सांस्कृतिक वेगळेपणा, प्रादेशिक अस्मिता, आणि सामाजिक व आर्थिक मागासलेपणाच्या कारणांनी करण्यात आलेल्या आहेत. सध्या निवडणुकीच्या तोंडावर उत्तरप्रदेशच्या मुख्यमंत्री मायावती यांनी उत्तरप्रदेशाचे चार राज्यांत विभाजन करण्याचा ठराव विधानसभेत मंजूर करवून घेतला आणि छोट्या राज्यांचा मुद्दा पुन्हा चर्चेला आला. अगोदरच आंध्रातून स्वतंत्र तेलंगणा राज्यासाठी तीव्र आंदोलन चालू आहे. तेलंगणाची प्रेरणा घेऊन स्वतंत्र विदर्भाची मागणीही महाराष्ट्रात जोर धरू शकते. तसेच भारतातील अनेक मोठ्या राज्यांतून छोट्या राज्यांच्या मागण्या येत आहेत. या पार्श्वभूमीवर खरोखरच अशा छोट्या राज्यांची आज आवश्यकता आहे का? छोटी राज्ये निर्माण केल्याने त्या-त्या राज्यांचा विकास होईल का? अथवा अशा राज्यांचा भारतीय राजकीय व्यवस्थेला धोका निर्माण होऊ शकतो का? भारतीय संघराज्यावर काय परिणाम होईल, तसेच केंद्रीय राजकारणावर काय परिणाम होईल, पक्षीय राजकारणाच्या हालचाली कशा होतील, छोट्या राज्यांचा अंतर्गत कारभार सुलभ होईल का? किंवा राजकीय अस्थिरता निर्माण होईल का? अशी छोटी राज्ये आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी होऊ शकतील का? का ती केंद्रीय शासनावर अवलंबून राहतील? छोट्या राज्यात स्थानिक वर्चस्वशाली, जाति-गटांचा, भांडवलदारांचा प्रभाव निर्माण होईल का? एकंदरीत अशी छोटी राज्ये निर्माण केल्याने राष्ट्रीय-राज्य राजकारणात कोणकोणते पेच निर्माण होऊ शकतात, कोणती राजकीय समीकरणे बदलू शकतात, याचा शोध प्रस्तुत शोधनिबंधात घेण्यात येणार आहे.

**छोट्या राज्याच्या निर्मितीची ऐतिहासिक पार्श्वभूमी**

स्वातंत्र्यानंतर भारताने संविधानात संघराज्यात्मक शासनव्यवस्थेचा स्वीकार केला. संघराज्यात्मक शासन-व्यवस्थेत दोन राजकीय शासने असतात. एक केंद्रीय शासन आणि दुसरे राज्य शासन. भारतीय संविधानाने केंद्र सरकारला अधिकाधिक शक्ती आणि अधिकार देऊन भारतात एकात्म संघराज्यव्यवस्था प्रस्थापित केली आहे. त्यामुळे केंद्राचे राज्यावर राजकीय, आर्थिक, विधिक व प्रशासकीय नियंत्रण प्रस्थापित झाले आहे. तरी राज्ये आपापल्या शक्ती व अधिकारांचा उपयोग करून विकास करतात, पण विशेष परिस्थितीत केंद्रावर अवलंबून राहतात. संविधानात एकात्म आणि सहकार्यात्मक संघराज्य अपेक्षिले आहे.

स्वातंत्र्यपूर्व ब्रिटिश वसाहतकाळात १९२० साली नागपूर येथे भरलेल्या राष्ट्रीय काँग्रेसच्या अधिवेशनात भाषेच्या आधारावर राज्य निर्माण करण्याचे ठरले. याच आधारावर ब्रिटिशांनी १९३६ साली ओडिया, हिंदी आणि सिंधी भाषेच्या आधारावर ओरिसा, बिहार, आणि सिंध प्रांत निर्माण केले. स्वातंत्र्यानंतर मद्रास प्रांतात तमिळ आणि तेलगू भाषिक राजकारण्यांत संघर्ष सुरू झाला. स्वतंत्र आंध्रासाठी स्वातंत्र्यसैनिक पी. श्रीरामलू यांनी उपोषण सुरू केले. उपोषणातच त्यांचा मृत्यू झाला आणि आंध्रात चळवळ सुरू होऊन हिंसाचार उसळला. सरकारने दबावाखाली येऊन मद्रास प्रांतातील तमिळ आणि तेलगू भाषिक संघर्ष संपुष्टात आणून १९५२ मध्ये आंध्र आणि तामिळनाडू राज्य निर्माण केले.

भारत सरकारच्या गृहमंत्रालयाने २९ डिसेंबर १९५३ रोजी न्या. श्री. फाजल अलीच्या अध्यक्षतेखाली राज्य-पुनर्रचना आयोग निर्माण केला. या आयोगाच्या सदस्यांमध्ये पंडित हृदयनाथ कुंझरू, के. एम्. पणिक्कर, व पी. सी. चौधरी (सचिव) यांचा समावेश होता. या राज्य पुनर्रचना आयोगाने आपला अहवाल सरकारला

अनुक्रमणिका







३० सप्टेंबर १९५५ला सादर केला. केंद्र सरकारने तो १९५६ मध्ये स्वीकारला. भाषिक जनसमूहाच्या आधारावर अर्थात 'एक भाषा एक राज्य' असे करण्याचे ठरले, त्यामुळे देशातील समूहा-समूहांतील भाषिक संघर्ष संपुष्टात आणून १४ राज्ये आणि सहा केंद्रशासित प्रदेश निर्माण करून देशातील विविधतेत एकता हे स्वप्न साकार करण्यात आले. हीच राज्यपुनर्रचना आयोगाची फलश्रुती म्हणावी लागेल. याला अपवाद हिंदी भाषिक राज्यांची संख्या एकापेक्षा अधिक होती. त्याचप्रमाणे द्वैभाषिक मुंबई राज्य हा त्या पुनर्रचनेतील दुसरा अपवाद. मात्र १९६०ला द्वैभाषिक मुंबई राज्य लयाला गेले आणि स्वतंत्र गुजरात आणि महाराष्ट्र भाषेच्या आधारावर निर्माण झाले. भाषावार प्रांतरचनेत एक दोष राहून गेला, तो म्हणजे एक भाषा बोलणारा भाषिक समूह अन्य भाषिक राज्यात तसाच राहून गेल्याने काही असंतोष निर्माण झाले, उदा. बेळगावचा प्रश्न. मराठी भाषिक कानडी कर्नाटक राज्यात राहून गेल्याने निर्माण झालेले असंतोषाचे वातावरण आणि त्यातून निर्माण झालेला सीमावादाचा प्रश्न, हा अपवाद वगळता राज्यपुनर्रचना जवळपास पूर्णत्वास गेली.

**प्रा. के. एम. पणिक्कर :**

राज्यपुनर्रचना आयोगाचे सदस्य प्रा. के. एम. पणिक्कर यांनी आयोगाच्या अहवालात आपली भिन्न मतदर्शिका जोडली होती. त्यात 'एक भाषा एक राज्य' या तत्त्वाऐवजी 'एक राज्य एक भाषा' या तत्त्वाचा स्वीकार करावा. त्यामुळे एक भाषिक जी भौगोलिक दृष्ट्या मोठी राज्ये राहिलेली आहेत, त्यांचे विभाजन करून राज्ये निर्माण करावीत, अशी त्यांची भूमिका होती. राज्यांचा आकार लहान असल्यामुळे प्रशासकीय सुलभता वाढेल, अंमल चांगला होईल, विधिमंडळात नेत्यांचे प्रशिक्षण, राजकीय समाजीकरण योग्य होईल, असा त्यांचा विचार होता. त्यामुळेच त्यांनी उत्तरप्रदेशाचे विभाजन दोन स्वतंत्र राज्यांत करावे, अशी भूमिका घेतली होती. उत्तरप्रदेशासारखे लोकसंख्येच्या दृष्टीने मोठे आणि लोकसभा व राज्यसभेत प्रबळ संख्यात्मक प्रतिनिधित्व असलेले राज्य भारतासारख्या संघराज्यात्मक व्यवस्थेत अनिष्ट ठरू शकते; त्याच राज्याचा वरचष्मा संसदेवर पडू शकतो, अशी टिप्पणी त्या वेळी त्यांनी जोडलेली होती. त्यांचे ते विचार आपण लहान राज्य निर्माण करून अमलात आणत आहोत.

**डॉ. आंबेडकरांची भूमिका :**

त्यांच्या प्रकृती अस्वास्थ्यामुळे ते आपली साक्ष राज्यपुनर्रचना आयोगासमोर देऊ शकले नाहीत, १९५५ मध्ये लिहिलेल्या भाषावार प्रांतरचना या पुस्तिकेत त्यांनी प्रा. पणिक्करांच्या भूमिकेला अनुमोदनच दिलेले होते. 'एक राज्य एक भाषा' या तत्त्वानुसार भौगोलिक दृष्ट्या मोठ्या राज्यांचे प्रशासनाच्या व्यवस्थापनाच्या दृष्टीने, आकाराने अनेक लहान राज्यांमध्ये विभाजन करण्यात यावे, अशी त्यांची भूमिका होती. म्हणूनच त्यांनी एकट्या उत्तरप्रदेशाची पश्चिम उत्तरप्रदेश, मध्य उत्तरप्रदेश आणि पूर्व उत्तरप्रदेश अशी तीन राज्ये निर्माण करण्यात यावीत, बिहारमधून उत्तरबिहार आणि दक्षिण बिहार, अशी दोन तर मध्यप्रदेशातून उत्तर मध्यप्रदेश आणि दक्षिण मध्यप्रदेश अशी दोन, तर महाराष्ट्रातून पश्चिम, मध्य आणि पूर्व महाराष्ट्र अशी तीन राज्ये वेगळी करावीत, असा प्रस्ताव मांडला होता. याशिवाय मुंबईचे एक स्वतंत्र राज्य करावे, या मताचे ते होते. राज्यनिर्मितीबाबत 'एक राज्य एक भाषा' हेच धोरण उचित असल्याचे त्यांचे मत होते. अशी लहान राज्ये निर्माण केल्याने संसदीय व्यवस्थेत मोठ्या राज्यांचा प्रभाव निर्माण होऊ शकत नाही. तसेच प्रशासकीय सुलभतेसाठी छोटी राज्ये महत्त्वाची ठरतात, तसेच लहान विधिमंडळ असणाऱ्या राज्यात राजकीय नेत्यांचे प्रशिक्षण निकोपणे होऊ शकते. त्याचप्रमाणे एकभाषिक राज्याचे विभाजन झाल्याने प्रदेशवादालाही आळा बसू शकतो.

वरील राज्यनिर्मितीबाबतच्या सूचनांची तेव्हा कोणी दखल घेतली नाही. आता मात्र काळाच्या परिस्थितीनुसार तेच धोरण आपणास स्वीकारावे लागत आहे. मोठ्या राज्यांतर्गत भाषिक अल्पसंख्याकांनी स्वतंत्र राज्याच्या मागण्या केल्या. त्यानुसार पंजाबचे विभाजन करून पंजाब आणि हरियाना ही स्वतंत्र राज्ये निर्माण करण्यात आली (१९६७). तसेच आसामचे विभाजन करून सात विभिन्न भाषिक राज्ये निर्माण करण्यात आली. पूर्वोत्तर प्रदेशांचे पुनर्गठन अधिनियमानुसार १९७१ ला मेघालय, मणिपूर










आणि त्रिपुरा राज्ये निर्माण करण्यात आली. १९८६ च्या पुनर्गठन अधिनियमानुसार मेझोराम राज्य आणि केंद्रशासित अरुणाचल प्रदेशाला पूर्ण राज्यांचा दर्जा देण्यात आला. १९८७ ला गोवा अधिनियमाद्वारे गोव्यास राज्याचा दर्जा देण्यात आला. गेल्या काही दशकांपासून विकासाबाबतच्या प्रादेशिक असमतोलातून अनेक राज्यांच्या मागण्या पुढे येत आहेत. याला शासनाच्या दूरदृष्टीचा अभाव, राजकारण्यांतील इच्छाशक्तीचा अभाव, शासकीय अंमलबजावणीतील त्रुटी यामुळे विकासाचा असमतोल वाढत गेला असून त्यातून सामाजिक व आर्थिक मागासलेपणाच्या कारणाने अनेक छोट्या राज्यांच्या मागण्या पुढे आलेल्या आहेत. भाजपाने जानेवारी व नोव्हेंबर २००० मध्ये विकासाच्या आधारावर उत्तरप्रदेशातून-उत्तरखंड, मध्यप्रदेशातून-छत्तीसगढ आणि बिहारमधून-झारखंड राज्याची निर्मिती केलेली आहे. सध्या सामाजिक व आर्थिक मागासलेपणाच्या, सांस्कृतिक वेगळेपणाच्या आणि राजकीय उदासीनतेच्या आधारावर आन्ध्रातून-तेलंगणाची, महाराष्ट्रातून-विदर्भाची, उत्तरप्रदेशातून-पूर्वांचल, पं. बंगालमधून-गुरखालँड, आसाम-बोडोलँड इत्यादी छोट्या राज्यांच्या मागण्या चळवळीच्या माध्यमातून करण्यात आलेल्या आहेत.

**राज्य निर्माण करण्याचा अधिकार संसदेचा**

राज्याच्या प्रचलित व्यवस्थेत व रचनेत बदल घडवून आणण्याचे अधिकार संसदेला आहेत. कलम-३ नुसार नवीन राज्यांची निर्मिती, एखाद्या राज्याच्या भौगोलिक क्षेत्रात घट अथवा वाढ करणे, राज्यांच्या सीमेत, नावात बदल करणे हे संसद बहुमताने ठराव संमत करून करू शकते. पण प्रत्यक्षात नवीन राज्यनिर्मितीच्या प्रक्रियेत अनेक पर्याय असू शकतात. त्यांत पहिला असा की, एखाद्या राज्याचे विभाजन करून नवीन स्वतंत्र राज्य निर्माण करणे. दुसरा पर्याय दोन किंवा दोनपेक्षा अधिक राज्यांचे एकत्रीकरण घडवून आणणे. तिसरा पर्याय दोन वा अधिक राज्यांमधील काही प्रदेश एकत्रित करून त्याला नवीन राज्य म्हणून दर्जा देणे. अशा प्रकारचा कोणताही बदल करताना संबंधित राज्यांशी विचारविमर्श करणे संसदेवर बंधनकारक असते.

राज्यनिर्मितीच्या प्रक्रियेत प्रथम केंद्रीय मंत्रिमंडळ राज्यनिर्मितीचा मसुदा तयार करते आणि राष्ट्रपतिकडे पाठविते. राष्ट्रपती हा मसुदा संबंधित राज्याकडे मतमतांतरे घेण्यासाठी पाठवितात. हा मसुदा राज्याने किती अवधीत द्यावा, हे राष्ट्रपतीच ठरवितात. राज्यांचे मतप्रदर्शन आल्यानंतर राष्ट्रपती मंत्रिमंडळाकडे पाठवितात. मंत्रिमंडळ चर्चेसाठी, संमतीसाठी संसदेकडे पाठविते. संसदेने राज्यनिर्मितीच्या मसुद्यावर २/३ बहुमताने ठराव संमत केल्यास, राज्यनिर्मितीचा ठराव संमत होतो. पहिला राज्य पुनर्रचना आयोग आला तेव्हा केंद्रात काँग्रेस पक्षाचे बहुमताचे सरकार होते. म्हणून ते संमत झाले. आता सध्या आघाडी सरकार केंद्रात आणि राज्यात आल्याने नवीन राज्यनिर्मितीचा मुद्दा अधिक गुंतागुंतीचा बनलेला आहे. छोट्या राज्यांच्या मुद्द्यावर पक्षांत मतभेद आहेत. भाजपाने समर्थन केलेले आहे, तर काँग्रेसने सुरुवातीपासूनच छोट्या राज्याला विरोध केलेला आहे. जसे नेहरूंनी विदर्भ राज्याला त्या वेळी केलेला विरोध तर इंदिरा गांधींनी तेलंगणानिर्मितीला विरोध करून समतोल विकास करण्याचे सूचित केलेले होते. सद्यःस्थितीत काँग्रेसने तेलंगणाच्या बाबतीत बोटचेपी भूमिका घेतलेली आहे. काँग्रेसला वाटते की, छोटी राज्ये निर्माण झाली, म्हणजे आपली त्या राज्यांतील ताकद कमी होईल आणि त्या - त्या प्रांतातील प्रादेशिक पक्षांचे प्रभुत्व वाढेल, नेत्यांचे वर्चस्व वाढेल आणि काँग्रेस अल्पमतात येईल. यात सत्यताही आहे. समजा, तेलंगणा राज्य झाले तर तेलंगणा राष्ट्र समिती आणि त्याचे नेते चंद्रशेखररावांचे वर्चस्व वाढण्याची दाट शक्यता आहे. छोट्या राज्यनिर्मितीचा प्रश्न हा संसदेच्या बहुमतावर अवलंबून असला, तरी संसदेत आघाड्यांच्या शासनामुळे संमत होण्याचा गुंतागुंतीचा प्रश्न निर्माण होतो. त्यात पक्षांचे, नेत्यांचे हितसंबंध महत्त्वाचे बनू शकतात. तसेच ज्या राज्यातून या मागण्या येतात, त्या राज्यातसुद्धा एकमत असत नाही. जसे तेलंगणाला, विदर्भाला स्थानिक पक्षांचा संघटनांचा प्रचंड विरोध आहे. त्यामुळे येणाऱ्या काळात छोटे राज्य निर्माण करणे, हे जिकीरीचे काम होणार आहे.

**छोट्या राज्यनिर्मितीच्या पेचाचे बहुआयामी स्वरूप**

छोट्या राज्यांच्या मागणीचे समर्थन करताना छोटी










राज्ये लोकशाही मजबूत व प्रभावशील बनवितात, अशा छोट्या राज्यांत सत्तेचे विकेंद्रीकरण सहज जनतेपर्यंत पोचते, जनतेचा राजकीय सहभाग वाढतो, सत्तेचा लाभ लवकर मिळतो, आर्थिक विकासास गती मिळते तसेच अशा राज्यांत जनतेचे राजकीय प्रशिक्षण व सामाजीकरण करणे सुलभ जाते, महत्त्वाचे म्हणजे प्रशासन व्यवस्थेत सुलभता वाढते, असे युक्तिवाद केले जातात. पण हे युक्तिवाद योग्य आहेत का? याचा सर्व बाजूंनी अभ्यास केल्यानंतर असे लक्षात येते की, अशा छोट्या राज्यांमुळे भारतीय संघराज्यात बहुपदरी पेच निर्माण होण्याची दाट शक्यता आहे. पण आपल्यावर सतत अन्याय होत असल्याचे तसेच आपल्या सांस्कृतिक, भाषिक वा प्रादेशिक अस्मितांची पायमल्ली होत असल्याची तीव्र भावना, सतत विकासातील काही भूभागातील वाढत चाललेला असमतोलपणा, यांमुळे छोट्या राज्यांच्या मागण्या येत असताना दिसतात. उत्तरप्रदेश एक मोठा भूभाग आणि लोकसंख्येने अवाढव्य असलेले राज्य आहे. त्यामुळे त्याचे नीट व्यवस्थापन करणे, प्रशासकीय योजना कार्यक्षमतेने राबविणे, हे दिवसेंदिवस अडचणीचे होत आहे. म्हणून मुख्यमंत्री मायावतींनी उत्तर प्रदेशाचे विभाजन करून स्वतंत्र पश्चिम हरित प्रदेश (२२ जिल्हे), बुंदेलखंड (११ जिल्हे), अवधप्रदेश (१४ जिल्हे), पूर्वांचल (३० जिल्हे) अशी चार राज्ये निर्माण करण्याचा ठराव विधानसभेत संमत केला. मायावतींनी निवडणुकीच्या तोंडावर जनाधार मिळविण्यासाठी राजकारणाचा भाग म्हणून असे केलेले असले, तरी त्यांना असे वाटते की, ज्या भूभागातून स्वतंत्र राज्याच्या मागण्या येतात, त्यांचा आपणाला पाठिंबा मिळेल आणि बसपाची ताकद वाढेल. असे असले तरी संख्यात्मक दृष्टीने अशा मोठ्या राज्यांचे चार राज्यांपेक्षा दोन राज्ये करणे, हे प्रशासनाच्या दृष्टीने योग्य राहील; कारण छोटी राज्ये अनेक कारणांनी हानिकारक ठरत आहेत. जेवढी छोटी राज्ये वाढतील, तेवढी आंतरराज्यीय तंट्यांत वाढ होईल आणि अनेक नवनवीन प्रश्न व्यवस्थेसमोर येतील.

(१)

पहिला मुद्दा असा की, मागासलेपणाच्या आधारावर नवीन राज्य निर्माण करण्याचा युक्तिवाद वरकरणी तत्काळ पटणारा आणि विकासासाठी भुरळ पाडणारा असला, तरी तो अनेक कारणांनी अडचणीचा ठरू शकतो. पूर्ण देशातील अनेक राज्यांतील बहुतेक प्रदेश हे असेच मागासलेले आहेत; त्यामुळे प्रत्येक मागास भागाचे राज्य निर्माण करणे, हा राजकीय व्यवस्थेसमोरचा पेच निर्माण होऊ शकतो. सामाजिक, सांस्कृतिक विभिन्नता असणाऱ्या देशात अशी छोटी-छोटी राज्ये निर्माण करून त्यांची पुनर्रचना करणे, सीमा निश्चित करणे, हे गुंतागुंतीचे ठरू शकते. तसेच सांस्कृतिक, भाषिक समूहांना असे अलगअलग करण्यामुळे त्यांची स्वतंत्र ओळख, अस्मिता जोपासली-पोसली जाणार नाही का? हा प्रश्न निर्माण होऊ शकतो. भारत हा विविधतेत एकता असणारा देश आहे. अशी बहुविविधता स्वतंत्र राज्यांत रूपांतरित केली तर राज्यांत विभिन्न कारणांनी संघर्ष निर्माण होऊ शकतो. तसेच ते असहिष्णुवादी बनतात. जसे उत्तरपूर्वेकडच्या राज्यांत अशी परस्परांविषयी असहिष्णुता आहे. त्यामुळे अशी छोटी राज्ये निर्माण करून व्यवस्थेत पेचाचा गुंता करण्यापेक्षा लोकशाही मूल्ये, बहुविविधता, मागास भागांचा विकास यांना प्राधान्य देणे गरजेचे आहे. केवळ मागास भागांचा विकास करावयाचा म्हणून स्वतंत्र राज्याचा पर्याय हा मार्ग चुकीचा आहे. मग ओरिसा, झारखंड आणि उत्तरपूर्वेकडची राज्ये मागास का आहेत, हा प्रश्न निर्माण होतो. त्यासाठी विकासाबाबतीत नियोजनपूर्वक कार्यक्षम विकासाच्या योजना त्याही जलद गतीने करणे, आवश्यक निधीची लवकर पूर्तता, तसेच नेत्यांची जबर इच्छाशक्ती असणे, आवश्यक आहे. नवीन राज्ये निर्माण केली तरी तेच करावे लागणार आहे. उलट, अशी नवीन राज्ये निर्माण करण्यासाठी प्रशासकीय संरचना उभारण्यासाठी आर्थिक बोजा त्या राज्यांवर आणि केंद्र सरकारवर पडतो.

(२)

दुसरा मुद्दा असा की तेलंगणाबाबत श्रीकृष्ण समितीने दिलेल्या अहवालावरून तेलंगणानिर्मितीचा घोळ आणखीच वाढला आहे. या अहवालात तेलंगणा राज्याची निर्मिती करणे, आर्थिक दृष्ट्या व्यवहार्य आहे; कारण तेलंगणा सर्वंकष मागास आहे आणि हेच तेलंगणाच्या मागणीचे मूळ कारण आहे असे म्हटले आहे. त्याबरोबरच तेलंगणा










राज्यकर्त्यांची, तेलंगणा समाज, भाषा, संस्कृतीची अवहेलना या सर्वांच्या एकत्रित परिणामातून स्वतंत्र तेलंगणाची मागणी पुढे आली, हेही निरीक्षण नोंदवले आहे. समितीने तेलंगणाबाबतीत जे पर्याय सुचविले, त्यांतील पहिला पर्याय असा की, संयुक्त आंध्रासह तेलंगणा प्रांताच्या विकासासाठी घटनात्मक तरतूद करणे. हा पर्याय समितीला सर्वोत्तम वाटतो. दुसरा असा की, हैद्राबादसह स्वतंत्र तेलंगणा राज्याची निर्मिती. तिसरा पर्याय सीमावर्ती रायलसीमा प्रांतातील जनतेच्या संमतीने स्वतंत्र तेलंगणा राज्य व्हावे. या सर्व पर्यायांवर सर्वसंमती होण्याची सध्यातरी शक्यता नाही. सध्याची तेलंगणा राज्याची तीव्र चळवळ लक्षात घेता तेथील लोकभावना तेलंगणासकट संयुक्त आंध्राचा विचार करू शकत नाही, तर हैद्राबादसकट तेलंगणाची कल्पना आंध्रवाल्यांना मानवणार नाही. हा दुहेरी पेच निर्माण झालेला आहे. हैद्राबाद शहर हे तेलंगणाच्या भौगोलिक क्षेत्रात येते; पण हैद्राबादमध्ये भांडवल गुंतवणूक, कारखाने, व्यापार, चित्रपटउद्योग इत्यादी यांवर कब्जा रायलसीमा आणि आंध्रावाल्यांचा आहे. त्यांना असे वाटते की, तेलंगणा राज्य निर्माण झाले, तर हैद्राबाद तेलंगणात जाईल, हैद्राबाद शहराचा आर्थिक फायदा तेलंगणाला होईल. त्यामुळे तेलंगणानिर्मितीचा मुख्य पेच हा हैद्राबाद शहराच्या समावेशाचा आहे. तेलंगणा राज्य निर्माण करणे आर्थिक दृष्ट्या योग्य असले, तरी अशा अडचणी येतात. त्याचबरोबर श्रीकृष्ण अहवालातून पुढे आलेले सत्य हे की, राज्यातील सर्वाधिक मागास भाग तेलंगणा नसून रायलसीमा आहे. वीज, सिंचन, शिक्षण, रस्ते, व्यापार अशा विकासांच्या सर्वच निर्देशांकावर रायलसीमा हा भाग राज्यातील सर्वाधिक मागास असल्याचा समितीचा निष्कर्ष आहे. या प्रांतातील ९ मुख्यमंत्री, २५ वर्षे सत्तेवर असतानादेखील हा भाग मागास आहे, या बाबीवरून काही स्थानिक संघटनांनी तेलंगणाबरोबरच रायलसीमामधील कुरनुल, कडप्पा, अनंतपूर, चित्तुरसहित तटवर्ती आंध्रातील ९ जिल्ह्यांतील दोन जिल्हे प्रकासम, पोट्टी श्रीरामलू यांना मिळून स्वतंत्र रायलसीमा राज्य बनवावे, अशा मागणीला पाठिंबा दिला आहे. वरील सर्व बाबी लक्षात घेता तेलंगणा प्रश्न सध्यातरी मिटण्याची चिन्हे दिसत नाहीत. उलट, तेलंगणाच्या तीव्र आंदोलनामुळे राज्याच्या आर्थिक विकासावर परिणाम होत आहे. गेल्या चार-पाच वर्षांपासून राज्याच्या उत्पादनवाढीवर त्याचा वाईट परिणाम झालेला आहे, हे कटू सत्य समोर आले आहे.

(३)

तिसरा मुद्दा असा की, अशी छोटी राज्य निर्माण केल्यामुळे लोकांच्या स्थितीत सुधारणा होणार नाही अथवा विकासही होणार नाही. मुळात विकास करण्यासाठी छोट्या राज्यांची आवश्यकता नाही; तर राजकीय नेत्यांच्या योग्य मानसिकतेची आहे. तसेच शासकीय अधिकाऱ्यांचा दृष्टिकोण, निवडणुकीत योग्य उमेदवाराला निवडून देणे, विरोधी पक्षांची जागरूकता, धर्मनिरपेक्षवादी राजकारण आणि मीडियांची निःपक्षपाती भूमिका यांवर विकास अवलंबून आहे. मोठी राज्ये असतानासुद्धा बिहारचे मुख्यमंत्री नितीश कुमार आणि गुजराथचे नरेंद्र मोदी यांची इच्छाशक्ती आणि प्रभावी नियोजनाने विकास करता येतो, हे दाखवून दिलेले आहे. अशी छोटी राज्ये निर्माण केल्याने नेत्यांचे राजकीय स्वार्थ मात्र पूर्ण होऊ शकतात. मुख्यमंत्री, राज्यपाल, मंत्री या पदांची संख्या वाढते. प्रशासकीय यंत्रणा उभी राहते. कर्मचाऱ्यांची संख्या वाढते, यावरच बहुधा पैसा खर्च होईल, तसेच प्रशासकीय अधिकारी आणि राज्यकर्त्यांचे घोटाळे सतत वाढत राहतील. त्यासाठी अशा राज्यांना राज्यांचा कारभार चालविण्यासाठी केंद्राच्या आर्थिक मदतीवर अवलंबून राहावे लागेल. त्यामुळे विकास हा दूर होत जाईल. राज्यांचे विभाजन करणे ही राजकीय चाल आहे. अशी छोटी राज्ये ही स्वार्थी राजघराण्यांची बटीक बनतात. ते संस्थानिक बनू शकतात. अगोदरच भारतीय राजकारणात स्थानिक स्तरापासून वरपर्यंत राजकारणात घराणेशाही आहे. अशी छोटी राज्ये घराणेशाहीला बळकटी देऊ शकतात.

(४)

चौथा मुद्दा असा की विदर्भाच्या विकासाचा अनुशेष सतत वाढत राहिला, याला जबाबदार कोण? तर विदर्भाच्या मागसलेपणाला शासन आणि विशेषतः विदर्भातील नेते जबाबदार आहेत. विदर्भ हा पूर्वापार मागास आहे. नागपूर कराराद्वारे विदर्भाच्या विकासाच्या अटी मान्य करून त्याला महाराष्ट्रात समाविष्ट करण्यात आले. १९५६ला

संविधानात संशोधन करून मागास भूभागांच्या विकासासाठी विशेष निधी देण्याची तरतूद अनुच्छेद-३७१ मध्ये करण्यात आली. त्यानुसार विदर्भात वैधानिक विकास महामंडळ तेव्हाच स्थापन करायला पाहिजे होते. ते १९९४ ला केले गेले. तसेच महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर महाराष्ट्राच्या विधिमंडळात स्टेटमेंट ऑफ गव्हर्नमेंट पॉलिसी म्हणजे विदर्भाचा विकास करण्याचा वचननामा सादर करण्यात आला. त्याचेही पालन झालेले नाही. एक बाब मात्र निश्चित की दांडेकर सत्यशोधक समितीचा अहवाल (१९८२), अनुशेष निर्देशांक समितीचा अहवाल (२०००), जलसंपदा प्राधिकरणाचा अहवाल (२००९-२०१०) यावरून हे स्पष्ट होते की, विदर्भाचा अनुशेष व मागासलेपणा कितीतरी पटीने वाढलेला आहे. मुख्य मुद्दा हा, की संविधानात्मक विकास योजनेची सुरुवात जर तेव्हाच झाली असती, तर कदाचित देशातील विभिन्न राज्यांतून प्रादेशिक विकासाबाबतचा जनतेचा प्रक्षोभ कमी झाला असता; पण शासनाच्या विकासांच्या योजना उशिरा सुरू झाल्या, त्यांची अंमलबजावणी होण्यास वेळ लागला. तोपर्यंत मागासभागांचा अनुशेष पटीने वाढत राहिला. विदर्भासाठी पंतप्रधानांनी विकासाचे पॅकेज दिले. पण ते वेळेवर निधी न मिळणे, त्याची नियोजनपूर्वक अंमलबजावणी न होणे, प्रशासकीय अधिकाऱ्यांचा वाढता भ्रष्टाचार, तसेच पक्षीय स्वार्थी राजकारण यांमुळे विदर्भ वैधानिक विकास मंडळाच्या योजना कोलमडल्या आहेत.

विदर्भातील नेते विदर्भाच्या प्रादेशिक असमतोलाचे खापर पश्चिम महाराष्ट्रातील नेत्यांवर फोडतात आणि बाजूला होतात. मात्र विदर्भाच्या विकासाचा असमतोल दूर व्हावा आणि अनुशेष दूर करण्यासाठी, निधी मिळविण्यासाठी, विदर्भाच्या नेत्यांनी एकत्र येऊन उपोषण केले नाही, अथवा राजीनामे दिले नाहीत. तर स्वार्थीपणाने आपापली राजकीय पोळी भाजून स्वार्थी राजकारण केलेले आहे. काँग्रेसच्या नेत्यांनी तर हायकमांडचा आदेश पाळण्यातच आयुष्य घालविले. विकासाच्या आधारावर स्वतंत्र विदर्भाचे राज्य करून विदर्भाचे दुष्टचक्र कमी होणार नाही; उलट ते वाढेल. त्यासाठी राजकारण्यांनी महत्त्वाकांक्षी विकासयोजना तातडीने हाती घेऊन अर्धवट राहिलेली कामे तीव्र गतीने पूर्ण करणे गरजेचे आहे. विदर्भाच्या निधीबाबत केंद्र-राज्य सरकारवर दबाव आणून निधी प्राप्त करावा. तसेच पळवला जाणारा निधी परत आणावा. यासाठी विदर्भवादी नेत्यांनी प्रयत्न केला, तरच विदर्भाचा विकास होईल. स्वतंत्र राज्य केले, तरी माणसे तीच राहतील. नेत्यांची प्रवृत्ती तीच राहील. मग विकास कसा होणार? त्यासाठी विदर्भवाद्यांच्या नेत्यांच्या प्रवृत्ती बदलायला पाहिजेत, हा मुख्य मुद्दा आहे.

(५)

पाचवा मुद्दा छोट्या राज्यांच्या कारभारातील स्थिरतेचा आहे. १९९० नंतर राष्ट्रीय पक्षांचा प्रभाव कमी होत गेला आणि प्रत्येक राज्यात स्थानिक पक्षांचा प्रभाव वाढत गेला. अर्थात राष्ट्रीय पक्षांचा ऱ्हास, प्रादेशिक पक्षांचे वाढते वर्चस्व, पक्षांतर्गत गटबाजी, पक्षात आयाराम-गयारामचे प्रमाण वाढले इत्यादी कारणांमुळे राष्ट्रीय आणि राज्य राजकारणात आघाड्यांची सरकारे आली. आघाडी सरकारच्या अनेक मर्यादा आहेत. त्यामध्ये राहून विकासाची कामे करणे मोठे मुश्कील आहे. कारण प्रत्येक धोरण वा निर्णय घेताना संवादाच्या मार्गाने घेणे, त्यावरचे मतभेद लक्षात घेता अवघड जाते. धोरणे जलदगतीने ठरविली जात नाहीत, त्यामुळे विकासकामाला गती मिळत नाही. जर आघाडी बिघडली तर मग राजकीय अस्थिरता निर्माण होते. ज्या विकासासाठी छोटी राज्ये निर्माण झाली, ती राजकीय अस्थिरतेच्या कचाट्यात सापडल्याचे दिसते. खऱ्या अर्थाने राज्यांच्या विकासासाठी स्थिरता महत्त्वाची असते. पण गोवा, झारखंड, उत्तरपूर्वेकडील राज्ये राजकीय अस्थिरतेने ग्रासलेली आहेत. गोवा राज्यात सुरुवातील १९६३ ते १९७९ मध्ये गोव्याचे राजकारण महाराष्ट्रवादी गोमांतक पक्ष व युनायटेड गोवन्स पार्टी या दोन स्थानिक पक्षांभोवती फिरत होते. या काळात भाऊसाहेब बांदोडकर व शशिकला काकोडकर या दोन व्यक्तींनी मुख्यमंत्रिपद आलटून-पालटून सांभाळले. कोणत्यातरी एक पक्षाला स्पष्ट बहुमत असायचे आणि सत्ता एका पक्षांची असायची, त्यामुळे गोवा राजकीय दृष्ट्या स्थिर होता. १९९० च्या नंतर गोव्याच्या राजकारणात काँग्रेस, भाजपाने प्रवेश केला. १९९५ नंतरच्या गोव्याच्या राजकारणात सत्तेसाठी अनेक पक्षांमध्ये स्पर्धा सुरू झाली. त्यात काँग्रेस, भाजपा, राष्ट्रवादी काँग्रेस, भारतीय








कम्युनिस्ट पक्ष, मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्ष, महाराष्ट्रवादी गोमांतक पक्ष, नवमहाराष्ट्रवादी डेमॉक्रेटिक पार्टी, तृणमूल काँग्रेस, शिवसेना, राष्ट्रीय समाजवादी पक्ष, लोकजनशक्ती पार्टी इत्यादी पक्षांमध्ये सत्तेसाठी पक्षीय स्पर्धा निर्माण झालेली आहे. भाजपा व काँग्रेसने जास्त जागा जिंकल्या, त्या मानाने प्रादेशिक पक्षांनी कमी जिंकल्या आहेत. या पक्षीय व्यवस्थेमुळे, तसेच गोव्याच्या राजकारणात आयाराम-गयारामचे प्रमाण सतत चालू असते त्यामुळे १९९० ते २००५ पर्यंत या पंधरा वर्षाच्या कार्यकाळात १४ वेळा सत्तांतर झालेले आहे. असेच झारखंड राज्याचे आहे. झारखंडमध्ये आतापर्यंत (९ वर्षांत) सहावेळा मुख्यमंत्री बदलले आहेत. आघाडी सरकारमधील गटा-तटांच्या, हितसंबंधांच्या राजकारणामुळे राजकीय अस्थिरता निर्माण होत असते, तसेच मणिपूर, नागालँड, मिझोराम या छोट्या राज्यांत सारखी अस्थिरता निर्माण झालेली आहे. या छोट्या राज्यांची पार्श्वभूमी पाहता जर तेलंगणा राज्य निर्माण झाले, तर सुरुवातीला कदाचित चंद्रशेखर रावच्या तेलंगणा राष्ट्र समितीला बहुमत प्राप्त होऊन राव मुख्यमंत्री होऊ शकतात. त्यांचे वर्चस्व वाढेल. काही काळ तेदेपाला आणि काँग्रेसला धक्का बसू शकतो; पण भविष्यात सत्तेसाठी स्पर्धा, तेदेपा, काँग्रेस, तेलंगणा राष्ट्र समितीमध्ये होईल. आघाडी सरकारे येतील आणि तेच पाढे मोजत बसावे लागेल. असेच विदर्भाचेही होईल. विदर्भात काँग्रेस, भाजपा, शिवसेना, राष्ट्रवादी पक्षाचे प्राबल्य आहे. विदर्भ राज्य निर्माण झाले, तर या पक्षांत सत्तेसाठी स्पर्धा होईल. विदर्भातील आतापर्यंतची पक्षांची बला-बलाची स्थिती पाहिल्यास २००४ च्या निवडणुकीत काँग्रेस आघाडीला ३२ जागा तर युतीला २८ जागा मिळाल्या. २००९ च्या विधानसभा निवडणुकीत काँग्रेस आघाडीला २८ तर युतीला २७ जागा मिळाल्या. यावरून सत्तेसाठी काट्याची टक्कर होण्याची दाट शक्यता आहे. त्यामुळे स्वतंत्र विदर्भ राज्य झाले, तरी तेथेही राजकीय अस्थिरता निर्माण होऊ शकते. प्रशासकीय सुलभतेसाठी छोटी राज्ये आवश्यक असतात; पण विकासासाठी छोटी राज्ये आवश्यक आहेत, हे तितकेसे सत्य नाही. त्याला अनेक घटक कारणीभूत असतात, हे लक्षात घ्यायला पाहिजे.

(६)

सहावा मुद्दा असा की, छोटी राज्ये आर्थिक दृष्ट्या सक्षम बनू शकतात का? तेलंगणाची मागणी करण्यात आल्यानंतर पुन्हा एकदा स्वतंत्र राज्याच्या मागणीस संजीवनी मिळाली आहे. अनेक राज्यांतून स्वतंत्र राज्यांच्या मागण्यांना ऊत आलेला आहे. महाराष्ट्रातून-विदर्भ, गुजरातमधून-सौराष्ट्र, कर्नाटकातून-कुर्ग, ओरिसातून-कोशलांचन, पश्चिम बंगालमधून-गोरखालँड, उत्तर बिहार, उत्तर प्रदेशाचा काही भाग आणि पश्चिम बंगालचा काही भाग मिळून मिथिलांचलची मागणी, उत्तरप्रदेशातून-स्वतंत्र चार राज्यांच्या मागण्या इत्यादी. अशी छोटी राज्ये निर्माण केली, तर त्या राज्यांची पुनर्रचना, प्रशासकीय यंत्रणेची उभारणी करणे, यासाठी व कायदा व सुव्यवस्थेसाठी भरपूर पैसा लागतो. हा पैसा कसा उपलब्ध करायचा, हा महत्त्वाचा प्रश्न आहे. त्या त्या राज्याची आर्थिक शक्ती ही त्या राज्यातील नैसर्गिक साधनसंपत्ती, औद्योगिक उत्पादन आणि उत्पन्न यांवर अवलंबून आहे. ज्या राज्यांची अशी आर्थिक शक्ती फारच कमजोर आहे, अशा राज्यांना आर्थिक मदतीसाठी केंद्राकडे मागणी करावी लागेल. भारतात बहुधा सर्वच राज्ये केंद्राच्या आर्थिक मदतीवर अवलंबून आहेत. त्यामुळे केंद्रसत्ता प्रबळ होते. तसेच सध्याच्या आघाड्यांच्या राजकारणात केंद्राकडून कसा न्याय मिळेल, हाही एक प्रश्न निर्माण होतो. अशी आर्थिक दृष्ट्या कमजोर राज्ये विकासकामे तीव्र गतीने करू शकत नाहीत. पूर्वेकडील झारखंड, उत्तराखंड, छत्तीसगड यावरून हे सिद्ध होते. ही राज्ये आर्थिक संकटांचा सतत सामना करत आहेत.

(७)

सातवा मुद्दा असा की, छोट्या अशा राज्यातील स्थानिक बहुसंख्याक, प्रभुत्वशाली जाती, हितसंबंधी गट आणि धर्मांचा राजकारणावर प्रभाव पडून राज-कारण अशा जाति-गटांच्या हिताभोवती फिरताना दिसते. त्यांचाच प्रभाव राजकारणात, उद्योगांत दिसतो. अशा राज्यात बहुसंख्याकांचा धोरणनिर्मितीवर प्रभाव पडून अल्पसंख्याक गटाच्या हिताला, विकासाला दुर्लक्षिले जाण्याची दाट शक्यता असते. गोव्यात भंडारी समाज, सारस्वत समाज, बहुजन समाज, ख्रिश्चन समाज यांचा प्रभाव आहे.

मुख्यतः भंडारी समाज ५०% असल्याने त्यांनाच राजकीय पक्ष जनाधारांसाठी प्राधान्य देतात. इतर अल्पसंख्य गटांकडे दुर्लक्ष होते. विदर्भात अनु-सूचित जाती, जमाती आणि मागासवर्गीयांचा प्रभाव वाढू शकतो. कारण त्यांची संख्यात्मकता अधिक आहे. हा मागास जमातींचा भाग स्वतंत्र राज्यात रूपांतरित झाल्यास उर्वरित महाराष्ट्रात प्रभावशाली मराठा समाजाचे वर्चस्व वाढण्याची संधी आपोआपच मिळते. तेलंगणाही स्वतंत्र राज्य झाल्यास तेलंगणात अनुसूचित जाती, जमाती, ओ. बी. सी. आणि अल्पसंख्याक मिळून ७०% लोक-संख्या याच समाजगटातील आहे. (श्रीकृष्ण समितीचा अहवाल) त्यामुळे समाजगटांचे राजकारण तेथील पक्ष करतील आणि त्यांचेच हितसंबंध पाहिले जातील, इतर समाजगटांकडे दुर्लक्ष होण्याची शक्यता राहील. अशा छोट्या राज्यांवर भांडवली अर्थमूल्यांचाही प्रभाव पडतो. बहुराष्ट्रीय कंपन्यांना आकाराने लहान असलेल्या आणि आर्थिकदृष्ट्या कमजोर असलेल्या राज्यातील सत्ताधीशांना आपल्या तालावर नाचवून आपल्याला अनुकूल धोरणे घेण्यास भाग पाडण्याला सोयीस्कर होऊ शकते. त्यामुळे अशा छोट्या राज्यांवर या भांडवली शक्ती कशा प्रकारे प्रभाव पाडतात, हेही पाहणे आवश्यक आहे.

(८)

आठवा मुद्दा असा की, मागास भूभागांसाठी संविधानात विशेष उपबंधाची व्यवस्था केली गेली. पण त्यात गैरवापर, भ्रष्टाचार झाला म्हणून ती यशस्वी ठरली नाही. पहिल्या राज्यपुनर्रचना आयोगाने भाषावार प्रांतरचना केल्यानंतर १९५६ ला संविधानात घटनादुरुस्ती करून जी राज्ये आर्थिक विकासाच्या प्रक्रियेत रखडलेली आहेत, अशा राज्यांच्या विकासासाठी विशेष लक्ष देण्यासाठी संविधानात भाग २१ मध्ये कलम ३७१ व त्या अंतर्गत असणारी पोटकलमाची व्यवस्था केलेली आहे. जसे कलम ३७१-गुजरात व महाराष्ट्र, ३७१-क नागालँड, ३७१-ख आसाम, ३७१-ग मणिपूर, ३७१-घ, ड आंध्रप्रदेश, ३७१-च सिक्कीम, ३७१-छ मिझोराम, ३७१-ज अरुणाचल प्रदेश, ३७१-झ गोवा इत्यादी. या राज्यांच्या विशेष विकासासाठी केंद्र सरकार अतिरिक्त निधी देईल, त्यातून त्या राज्याच्या राज्यपालांच्या नियंत्रणाखाली, अधिकाराखाली विकासाच्या योजना राबविल्या जातील. राष्ट्रपतींच्या नियंत्रणाखाली राज्यांचे राज्यपाल कार्य करतील. राज्यपाल निधीचे समन्यायी पद्धतीने वाटप करतील. तांत्रिक आणि व्यावसायिक शिक्षणांच्या सोयी, रोजगारांच्या संधी, नोकऱ्या आणि सरकारी क्षेत्रात संधी दिली जाईल. तसेच राज्यपाल विकासासाठी प्रादेशिक परिषदही निर्माण करू शकतो. त्यासंबंधीचे पूर्ण अधिकार राज्यपालाला असतात. राज्यपाल प्रतिवर्षी कार्याचा अहवाल राष्ट्रपतींकडे पाठवितो. मागास भूभागासाठी जी संविधानात्मक व्यवस्था केलेली आहे, त्यात वैधानिक विकास मंडळे, विकासांचे विशेष निधीचे पॅकेज, प्रादेशिक मंडळे ही म्हणावे तेवढी यशस्वी झालेली नाहीत. कारण पक्षीय स्वार्थी हितसंबंधाच्या राजकारणामुळे या योजना कोलमडल्या आहेत. त्याला कारण पैशांचा (हजारो कोटींचा) वाढता अपव्यय, भ्रष्टाचाराची वाढती प्रकरणे. गुरखालँडच्या विकासासाठी सरकारने 'गोरखा हिल डेव्हलपमेंट कौन्सिल' स्थापन केले, पण त्यानंतर या कौन्सिलमधील नेत्यांची भ्रष्टाचारांची प्रकरणे उघडकीस आली. अर्थात, हा विशेष दिलेला निधी कर्मचारी आणि नेत्यांच्या खिशात जातो आणि जनता त्याच ठिकाणी राहते, हे सिद्ध झालेले आहे.

केंद्र सरकारने बुंदेलखंडच्या विकासासाठी ७,२६६ करोड रुपयाचे पॅकेज दिले. हे पॅकेज जलसिंचन, शेती-सुधारणा, पर्यावरण, पशुपालन, नवीन विहीरी खोदणे, तलाव इत्यादींसाठी दिले; मात्र या पॅकेजचा विकासासाठी काहीही फायदा झालेला नाही. बुंदेलखंडची स्थिती जैसे थे आहे. शेतकऱ्यांच्या आत्महत्या चालूच आहेत. पैसे हे नेते-कंत्राटदारांच्या खिशात चाललेले आहेत. त्यामुळे विकास योजना कागदावरच आहेत. कंत्राटे गैर-मार्गांनी दिली जातात. स्थानिक आमदारांनी ही कंत्राटे आपल्या कंत्राटदार पार्टनरला दिलेली आहेत. केंद्रीय ग्रामीण विकास राज्यमंत्री प्रदीप जैन आदित्यने बुंदेलखंड पॅकेज अयशस्वी झाल्याचे मुख्य कारण पॅकेजचा गैरवापर आणि नेते-कंत्राटदारांचा वाढता भ्रष्टाचार हे सांगितले आहे. स्वतंत्र राज्य केले तरी नेत्यांची-कंत्राटदारांची हीच मानसिकता असेल. त्यामुळे स्वतंत्र राज्य हा विकासासाठी पर्याय होऊ शकत नाही. त्यासाठी मुळात विकासाची प्रबळ








इच्छाशक्ती, नियोजनपूर्वक विकास योजना आखणे, वाढत्या भ्रष्टाचाराला रोक लावणे आवश्यक आहे.

राज्याचे विभाजन केले तर अस्मितांचे राजकारण वाढू शकते. ही राजकारण्यांच्या आकांक्षेचे केंद्रे बनतात. असे विभाजन अनेक नव्या वादाला जन्म देऊ शकते. त्यामुळे नवे राज्य निर्माण करण्यापेक्षा स्थानिक स्तरावर पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी सत्तेचे जास्तीत जास्त विकेंद्रीकरण करणे गरजेचे आहे. त्याबरोबरच वैधानिक विकास मंडळाच्या अंमलबजावणीतील त्रुटी कमी करून ते मजबूत करणे, विशेष आर्थिक तरतूद करणे, कार्यक्षमता कशी वाढवता येईल, भ्रष्टाचार कसा कमी करता येईल, विकास योजनांना तीव्र गती कशी मिळेल हे पाहिले पाहिजे. तसेच स्थानिक समस्या व गरजांनुसार प्रशासकीय यंत्रणा लवचीक करणे गरजेचे आहे. असे झाले तर विकासासाठी स्वतंत्र राज्यांची गरज भासणार नाही.

**संदर्भसूची :–**


- Kimmatkar M. G. 2003, Study Report on Water Resources and Irrigation Potential in Vidarbha, submitted to Governor of Maharashtra.
- Report of the Committee for consultation on the situation in Andhra Pradesh, 2010, December, Government of India, New Delhi.
- Report of the State Reorgnization Commission, 1953 December, 29th Government of India in the ministry of Home Affairs, New Delhi.
- महाराष्ट्रातील प्रादेशिक असमतोलावरील सत्यशोधन समितीचा अहवाल, १९८४, नियोजन विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई.
- महाराष्ट्रातील मागास विभागाचा विकास, १९९३, राज्य नियोजन मंडळाच्या अभ्यास गटाचा अहवाल, नियोजन विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई.
- विदर्भ वैधानिक विकास मंडळ, १९९४ ते २००५, वार्षिक अहवाल, नागपूर.
- Amit Prakash, 2009-Jan-December, Brief Note for the Seminar's Is there a case for Reorganisation of states? Vol-XXI, Journal of Indian school of Political Economy, Pune, Page. 326.
- Dr. Durga Das Basu, 2010, Introduction to the Constitution of India, Lexis Nexis Butterworths Wadhwa, Nagpur.
- D. N. Dhanagare, Jan-Dec. 2009, A note on Demand for formation of a separate Vidarbha State, Vol-XXI, Journal of Indian school of Political Economy, Pune] Page 344.
- Gautam Pingale, Jan-December 2009, The Telangana Tragedy - A Lesson in Integration and Disintegration, Vol-XXI, Journal of Indian school of Political Economy, Pune, Page, 301, 605, 607, 311.
- K. Jayshankar, Telangana Movement: the Demand for A separate State : A Historical Perspective.
- Louise Tillin, May 14, 2011, Statehood and the Politics of Intent, VDL XL VI No. 20 EPW.
- P. R. Panchmukhi, Jan-Dec. 2009, Regional Justice Perspectives and the issue of states reorganisation in India : A Revist, Vol-XXI, Journal of Indian school of Political Economy, Pune, Page 201, 202.
- R. P. Kurulkar, Jan-Dec. 2009, Small and Large State : Comparative Performance of Socio-Economic Development, Vol-XXI, Journal of Indian school of Political Economy Pune, Page 339, 340.
- Ratnakar Mahajan, Jan-Dec. 2009,

The Statutory Development Boards In Maharashtra - A Reapraisal, Vol-XXI, Journal of Indian school of Political Economy, Pune, Page 345, 347.

- Suhas Palshikar, Jan-Dec. 2009, Formation of States/Reorganisation of States, Vol-XXI, Journal of Indian school of Political Economy, Pune, Page 322, 323.
- Sandeep Shastri, Jan-Dec. 2009, Formation of New State : Fedrealising the Process Institutionalising the mechanisms, Vol-XXI, Journal of Indian school of Political Economy, Pune, Page 328.
- Yogendra Yadav, Jan-Dec. 2009, On thinking abouts scale of Representative Government in India, Vol-XXI, Journal of Indian school of Political Economy, Pune, Page 320, 321.
- अशोक चौसाळकर, फेब्रु. २०१०, तेलंगणाचा तिढा, प्रबोधन प्रकाशन ज्योती, कोल्हापूर, पृष्ठ ३३.
- ओपन हाऊस, २७ नोव्हेंबर २०११, छोट्या राज्यांचा मोठा पेच, रविवार महाराष्ट्र टाइम्स, मुंबई.
- के. सी. सुरी, संक्षेप व अनुवाद : मनोहर सोनावणे, जाने-मार्च २००४, लोकानुरंजनवादाकडून व्यवहार-वादाकडे : आंध्रप्रदेश १९८३ ते २००३, अंक १६६, समाज प्रबोधन पत्रिका, पृष्ठ क्र. २७, २८.
- डॉ. बाबासाहेब आंबेडकर, २०१०, भाषावार प्रांतरचना, मिलिंद प्रकाशन, वर्धा, पृ. क्र. १५, २२, ४५.
- डॉ. श्रीनिवास खांदेवाले, ७ जानेवारी २०१०, छोट्या राज्यांची मागणी टाळता येईल का? दै. लोकमत, औरंगाबाद.
- धनंजय कुलकर्णी, २०१०, तेलंगणा अहवालामुळे गुंताच वाढला, महाराष्ट्र टाईम्स, मुंबई.
- धनंजय कुलकर्णी, २ जानेवारी २०११, तेलंगणाच्या आगीत, लोकसत्ता, मुंबई.
- प्रा. डॉ. किशोर महाबळ, मे-जून २०१०, वेगळ्या विदर्भ राज्याची चळवळ : दशा आणि दिशा, नवभारत, वाई, पृ. २४.
- प्रा. द. ना. धनागरे, जुलै २०११, स्वतंत्र विदर्भ राज्य : ध्यास, विचार आणि चळवळ, नवभारत, वाई, पृ. १८, २०.
- प्रफुल्ल बिडवई, १३ जानेवारी २०१०, तेलंगणा राज्याचा विषय झाला गुंतागुंतीचा, दैनिक लोकमत, औरंगाबाद.
- बिपनचंद्र, २०११, इंडिया आफ्टर इंडिपेंडन्स, के. सागर पब्लिकेशन, पुणे.
- माधव दातार, एप्रिल २०१०, स्वतंत्र विदर्भ : हेच उत्तर? महा अनुभव, युनिक फीचर्स मासिक, पुणे, पृ. ३७.
- राम प्रधान, अनुवाद समीर परांजपे, ५ सप्टेंबर २०१०, ज्वालामुखीच्या तोंडावर, लोकसत्ता, पुणे.
- सुरेश भटेवरा, नोव्हेंबर २०११, उत्तर प्रदेश विभाजनाचे राजकारण, महाराष्ट्र टाइम्स, मुंबई.
- य. दि. फडके, २००७, विसाव्या शतकातील महाराष्ट्र, संयुक्त महाराष्ट्र चळवळ १९४८ ते जानेवारी १९५६, खंड ७ वा, मौज प्रकाशन, मुंबई पृ. क्र. १३५, १५१.
- य. दि. फडके, २००७, विसाव्या शतकातील महाराष्ट्र, खंड ८, मौज प्रकाशन, गिरगांव, मुंबई, पृ. क्र. १०८.
- सुहास पळशीकर, १४ ऑगस्ट २०१०, राज्य-निर्मितीचे बहुपदरी पेच, साधना, पुणे पृ. ६१, ६२.
- अर्थबोधपत्रिका खंड ९, अंक ७, ऑक्टो. २०१०, पृ. ७, ९, १०, १२, १३, २६, २७.
- पीयुष बबेले, १५ जून २०११, बुंदेलखंड में. इंडिया टुडे, पृ. ३८, ३९.
- बिपनचंद्र, जुलै २०११, इंडिया आफ्टर इंडिपेंडन्स, के. सागर प्रकाशन, पुणे, पेज ४४३, ४४४.
- एक लक्ष्मीकांत, २०१०, कुच्छ राज्यों के लिए विशेष उपबंध, Tata MCGRAW, Hill, New






Delhi. पृ. १७.२, १७.३, १७.४.

- ॲड. मधुकर किंमतकर, २०११ डिसेंबर, अनुशेषाची सद्य:स्थिती, लोकराज्य, विदर्भ विशेष, महाराष्ट्र शासन, पृ. ७९.
- सुरेश द्वादशीवार, २०११ डिसेंबर; वंचना, उपेक्षा आणि अपेक्षा; लोकराज्य, महाराष्ट्र शासन, पृ.११.
- अमरनाथ के मेनन, २३ डिसेंबर २००९, आखिर झुकने को मजबूर, इंडिया टुडे.
- शांताराम पोटदुखे, २०१० ऑगस्ट, वैदर्भीयांची मानसिकता बदलायला हवी, साधना, पुणे पृ. ३५.
- नेहा फडके/स्वाती बोबडे, ४ फेब्रुवारी २०१२, गोवा अस्थिरतेचे राजकारण, साधना, पुणे, पृ.२२.
- हेमंत अरुणराव कडुकर; विदर्भाचे मागासलेपण आणि विदर्भ वैधानिक विकास मंडळ : एक अभ्यास; राज्यशास्त्र व लोकप्रशासन विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे (एम. फिल. प्रबंध अप्रकाशित)
- निळकंठ रथ, १४ ऑगस्ट २०१०, स्वतंत्र राज्य ही संतुलित विकासाची हमी नव्हे, साधना, पुणे, पृ. ५५, ५६.

☆☆☆

ग्रंथवेध

# जवाहरलाल नेहरूंच्या मतप्रणालीची जडणघडण

प्रा. श्री. मा. भावे

जवाहरलाल नेहरू हे १९४६ साली राजप्रतिनिधीच्या (व्हाइस-रॉय) कार्यकारी मंडळाचे उपाध्यक्ष या नात्याने सत्तेवर आले. हे पद पंतप्रधानपदाच्या समकक्ष असे होते. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर ते भारताचे पंतप्रधान झाले. १९५० च्या डिसेंबरमध्ये उपपंतप्रधान वल्लभभाई पटेल यांचे निधन होईपर्यंत त्यांच्या अधिकाराला काही प्रमाणात मर्यादा होती; पण पटेलांच्या पश्चात नेहरूंची कारभारावर पूर्ण पकड बसली. पटेलांनी काँग्रेसच्या अध्यक्षपदावर निवडून आणलेले पुरुषोत्तमदास टंडन यांच्याकडून अध्यक्ष-पदाचा राजीनामा घेतल्यानंतर नेहरू हे काँग्रेसचे अध्यक्ष झाले. नंतर त्यांनी इतरांकडे अध्यक्षपद दिले, तरी पक्षावर त्यांची घट्ट पकड होती. अशा रीतीने प्रशासन व पक्ष या दोन्हींवर नेहरूंचे जवळजवळ दीड दशक पूर्णतः वर्चस्व होते.

नेहरूंनी या काळात जी धोरणे राबविली त्यांचे भारताच्या प्रशासनव्यवस्थेवर, आर्थिक विकासावर पर-राष्ट्रीय संबंधांवर व भारताच्या अंतर्गत घटनेवर मूलगामी परिणाम झाले. योजनाबद्ध विकास, उद्योगधंद्यांवरील सरकारची नियंत्रणे, सरकारच्या मालकीचे कारखाने व उत्पादने, जमीनदारीचा उच्छेद व जमीनधारणेवरील मर्यादा, जिल्हा व गावपातळीवरील स्वराज्यसंस्थांच्या अधिकारात केलेली वाढ, सहकारी संस्थांना दिलेले उत्तेजन या सर्व गोष्टींचे बरे-वाईट परिणाम आजही आपल्या अनुभवाला येत आहेत. काश्मीरचा प्रश्न, चीनशी सरहद्दीच्या प्रश्ना-वरून झालेले युद्ध, संयुक्त राष्ट्रसंघात भारताने विविध प्रश्नांवर घेतलेली भूमिका व गटनिरपेक्षता ह्या धोरणांची जी आखणी नेहरूंनी केली, त्या आखणीची आपल्या आजच्या परराष्ट्र धोरणाशी अतूट साखळी जोडून देता येते. भारतीय समाजाला विज्ञानाभिमुख बनवणे, श्रुतिस्मृति-पुराणांच्या व अंधश्रद्धांच्या जोखडातून त्या समाजाला सोडवणे, वैज्ञानिक प्रगतीसाठी शिक्षणसंस्था आणि संशोधनसंस्था यांची निर्मिती करणे यांसारखी दूरगामी पावले नेहरूंनी निश्चयाने उचलली. अणुसंशोधन, अवकाशसंशोधन यांसारख्या त्या काळी सुशिक्षितांच्याही कल्पनेबाहेर असणाऱ्या क्षेत्रात संशोधन झाले पाहिजे व त्यासाठी निधी उपलब्ध करून दिला पाहिजे, हा आग्रह नेहरूंनी धरला व त्यामुळेच आज आपण त्या क्षेत्रात भरघोस प्रगती केली असल्याचे दिसून येते. ही यादी आणखीही लांबवता येईल. पण तसे करण्याची आवश्यकता नाही; कारण बहुतेक विचारी नागरिकांना नेहरूंच्या निरनिराळ्या धोरणांची व त्यांच्या परिणामांची माहिती असतेच.

वरील यादीत संसदीय, बहुपक्षीय लोकशाही आणि समाजवाद यांचा उल्लेख मी केला नाही; कारण या दोन्ही संकल्पना नेहरूंमुळे भारतात आल्या, असे आपण म्हणू शकत नाही. तथापि, नेहरूंच्या राजवटीचे हे सूत्र होते की, लोकशाहीची स्वाभाविक परिणती समाजवादातच होते. या अपेक्षित समाजवादाचे नक्की स्वरूप काय होते, याचा विचार आपण पुढे करणारच आहोत. संसदीय लोकशाही पद्धतीवर नेहरूंचा भरवसा असल्याने नेहरूंच्या विविध धोरणांची खुली चर्चा संसदेत वेळोवेळी झाली. उद्योगांवरील सरकारी नियंत्रणांचा अतिरेक होतो आहे, असे वाटणारे नेते काँग्रेसमध्ये व काँग्रेसबाहेरही होते. त्यांनी आपला 'स्वतंत्र पक्ष' नेहरूंच्या कारकिर्दीच्या उत्त-रार्धात काढला. नेहरूंनी स्वीकारलेले योजनाबद्ध विकासाचे धोरण अमान्य असणारे लोकही होते. योजना-आयोग हे एक वरिष्ठ मंत्रिमंडळ होत आहे, अशी टीका करत जॉन मथाई या अर्थमंत्र्यांनी राजीनामा दिला होता. पण असा विरोध लक्षात घेऊनही आपण असे म्हणू शकतो की, नेहरूंची धोरणे १९४० ते १९६५ या पंचवीस वर्षांत जी पिढी जाणतेपणाने वावरत होती, त्या पिढीच्या विचारांचे प्रतिनिधित्व करणारी होती. हा निष्कर्ष नेहरूंच्या नेतृत्वा-खालील काँग्रेसपक्षाने निवडणुकात ओळीने तीनदा विजय मिळविला, एवढ्यावरून काढलेला नाही; तर तत्कालीन

अनुक्रमणिका






वृत्तपत्रे, स्तंभलेखक, लोकमतावर कमी-जास्त प्रमाणात प्रभाव पाडणारे नेते यांनी वेळोवेळी व्यक्त केलेल्या मतांवरून सहज दिसून येणारा आहे.

प्रस्तुत लेखात विषय हा आहे की, नेहरूंच्या या विचारांची जडण-घडण कशी होत गेली, याचा शोध घेणे. सत्ता हातात आल्यावर नेहरूंनी जी धोरणे अवलंबिली, ती काही अकस्मात त्यांना स्फुरली, असे नक्कीच नाही. त्या धोरणांपाठीमागे नेहरूंनी दीर्घकाळ केलेला अभ्यास व चिंतन यांचा आधार होता. नेहरूंनी आपले विचार काँग्रेसच्या व्यासपीठावरून निरनिराळ्या भूमिकांतून वारंवार मांडले होते. त्या भाषणांवरूनही नेहरूंच्या परिपक्व होत गेलेल्या विचारांचा आलेख मांडता येतो. तेच काम इथे करावयाचे आहे.

'ग्रंथवेध' या सदराचे जे स्वरूप आहे, त्यापेक्षा काहीसे निराळे असे या लेखाचे वळण आहे. या सदरात एकेका ग्रंथाचा सटीक परिचय आपण करून घेत असतो. आताचा लेख हा 'नॅशनल अॅण्ड लेफ्ट मुव्हमेंट्स इन् इंडिया' या प्रा. के. एन्. पणिक्कर यांनी संपादन केलेल्या ग्रंथातील एस. गोपाल यांच्या 'द फॉर्मेटिव्ह आयडिऑलॉजी ऑफ् जवाहरलाल नेहरू' या लेखावर आधारित आहे. एस. गोपाल हे ख्यातनाम इतिहासकार होते. त्यांनी नेहरूंचे त्रिखंडात्मक चरित्र लिहिले, तसेच स्वतःचे वडील सर्वपल्ली राधाकृष्णन यांचेही चरित्र लिहिले. ही दोन्ही चरित्रे चरित्रनायकांचे यथायोग्य मूल्यमापन व्हावे, अशा उद्देशाने चरित्रातील तपशिलांची मांडणी करीत पुढे जातात. त्या तपशिलांतून त्या व्यक्तींची बलस्थाने, मर्मस्थाने आणि दुर्बलस्थाने सहजपणे उघडी होतात.

(१)

जवाहरलाल हे एका श्रीमंत घरात जन्माला आले. जवाहरलालांचे वडील मोतीलाल हे गडगंज श्रीमंत तर होतेच; पण त्या संपत्तीचा मनमुराद उपभोग घेण्याचीही त्यांची वृत्ती होती. मोतीलालांनी पैसा वकिलीत मिळवला व उत्तर प्रदेशातील जमीनदार हे त्यांचे अशील असत. अमेठीचे जहागिरदार हे त्यांपैकीच एक. त्यांना 'राजा' हा किताब होता. अमेठीच्या राजाच्या एका खटल्यातून मोतीलालांना इतके पैसे मिळाले की, त्यातून त्यांनी युरोपचा सहा महिने सहकुटुंब प्रवास केला! हिंदुस्थानात ज्या थोड्या लोकांकडे पहिल्यांदा मोटारी आल्या, त्यांपैकी मोतीलाल हे एक होते. जवाहरलाल यांना इंग्लंडमधील हॅरो या विख्यात 'पब्लिक स्कूल'मध्ये १९०५ ते १९०७ अशी तीन वर्षे मोतीलालांनी शिकायला ठेवले व नंतर १९०७ ते १९१० अशी चार वर्षे त्यांचे शिक्षण केंब्रिज विद्यापीठातील 'ट्रिनिटी' या प्रसिद्ध महाविद्यालयात झाले. मोतीलालांची इच्छा जवाहरलाल यांनी भारतीय सनदी सेवेत (आय. सी. एस.) जागा मिळवावी अशी होती. पण पदवीपरीक्षेत म्हणावे तसे यश न मिळाल्याने जवाहरलालांनी सनदी सेवेतील प्रवेशाच्या परीक्षेचा नाद सोडला व ते 'बॅरिस्टर' झाले. हे सर्व सांगण्याचा हेतू असा की, १९१२ साली, वयाच्या तेविसाव्या वर्षी, नेहरू इंग्लंडमधून हिंदुस्थानात परत आले, तोपर्यंत त्यांनी कोणत्याही राजकीय वा आर्थिक विचाराचा विशेष अभ्यास केला नव्हता; किंवा सर्वसामान्य हिंदी मनुष्याच्या परिस्थितीशीही त्यांचा जवळून परिचय झालेला नव्हता. श्रीमंत मध्यमवर्गीय तरुणांप्रमाणे आनंदात आयुष्य घालवावे, याकडे त्यांचा कल होता.

तथापि, या काळातही असाधारण व्यक्ती, असाधारण विचार व असाधारण साहसे यांची त्यांना ओढ होती. काहीतरी उत्तेजक घटना घडली की, जवाहरलाल यांच्या भावना उचंबळून येत व त्यांचे रक्त उसळे. जालियनवाला बागेत जनरल डायर याने निर्घृण गोळीबार करून शेकडो माणसे ठार मारली आणि इंग्रज सरकारने जनरल डायरला पाठीशी घालण्याचे निर्लज्ज प्रयत्न केले. डायर इंग्लंडला परत गेला तेव्हा 'वीरपुरुष' म्हणून त्याचे स्वागत झाले आणि त्याच्या निर्वाहाची सोय करण्यासाठी 'मॉर्निंग पोस्ट' या वर्तमानपत्राने सव्वीस हजार पौंडांचा निधी गोळा केला. पंजाबात लष्करी कायदा (जालियनवाला बागेच्या प्रसंगाच्या आधीच) पुकारण्यात आला होता. त्याचा वापर करून प्रजेवर अनन्वित अत्याचार करण्यात आले. या सर्व घटनांनी जवाहरलालांच्या मनात इंग्रजी राज्याविषयी पराकाष्ठेची चीड निर्माण झाली. परंतु, ही चीड एखाद्या भारतीयाने चवताळलेल्या शब्दांत व्यक्त केली असती, त्यापेक्षा वेगळ्या व 'पब्लिक स्कूल' मधील विद्यार्थ्याला शोभेल अशा भाषेत (जवाहरलाल) नेहरू यांनी मांडली आहे. इंग्रज राष्ट्राने डायरच्या कृत्याला

अनुक्रमणिका

जो पाठिंबा दिला, "त्यामुळे मला भयानक धक्का बसला. तो साराच प्रकार मला अनैतिक व असंस्कृत वाटला. 'पब्लिक स्कूल'च्या शब्दांत बोलायचे तर ही सारीच हकिकत म्हणजे 'हाईट ऑफ बॅड फॉर्म' अशी होती."

पंजाबातील सरकारी अत्याचार उघडकीस आणण्यासाठी काँग्रेसने एक चौकशी-समिती नेमली होती. त्या समितीत गांधी होते. त्यांनी अतिशय काटेकोरपणे व नेटाने चौकशी चालविली होती. जवाहरलाल या समितीचे सभासद नव्हते; पण समितीच्या कामात मदत करीत होते. त्या वेळी गांधींशी व त्यांच्या कार्यपद्धतीशी जवाहरलाल यांचा निकटचा संबंध आला व ते अतिशय प्रभावित झाले. १९२० सालानंतर काँग्रेसवर असणारी इंग्रजी शिक्षण घेतलेल्या मध्यमवर्गाची पकड सैल होत गेली व या वर्गाच्या बाहेर असणारे अनेक घटक काँग्रेसमध्ये आले. त्यांच्या आकांक्षा व त्यासाठी काम करण्याची त्यांच्या पद्धती या वेगळ्या स्वरूपाच्या होत्या. अशा घटकांना सामावून घेईल असे नेतृत्व फक्त गांधीच पुरवू शकतात, अशी जवाहरलाल यांची धारणा होती. पहिली काही वर्षे, म्हणजे गांधींनी असहकाराची चळवळ फेब्रुवारी १९२२ मध्ये मागे घेतली तोपर्यंत, नेहरूंनी गांधींचे नेतृत्व निष्ठेने स्वीकारले होते. नंतर गांधींशी मतभेद झाले, तरी नेहरू गांधींशी जुळवून घेतच आले. नेहरूंच्या वैचारिक घडणीत गांधींचा प्रभाव हा महत्त्वाचा घटक होता.

गांधींच्या शिकवणुकीतून नेहरूंनी खादी, स्वदेशी, ग्रामस्वराज्य या कल्पना उचलल्या खऱ्या; पण शेतकऱ्यांच्या व ग्रामीण जनतेच्या विचारपद्धतींची व जीवनशैलीची नेहरूंना (इथून पुढे नेहरू म्हणजे जवाहरलाल नेहरू) फारशी जाण झाली होती, असे नाही. जाणीवपूर्वक घडवून आणावयाच्या आर्थिक व सामाजिक परिवर्तनाची जोड स्वातंत्र्याच्या चळवळीला दिली पाहिजे, हा विचार या काळात नेहरूंच्या मनाला शिवलाही नसावा. असहकाराची चळवळ मागे घेतल्यानंतर गांधींनी आपल्या अनुयायांनी विधायक कार्य हाती घ्यावे, असे सुचविले होते. त्याप्रमाणे काँग्रेस कार्यकर्त्यांनी गावोगावी जाऊन ग्रामसभा स्थापन केल्या होत्या. तथापि माओ त्से तुंग याने पुढे ज्या शेतकरीसंघटना चीनमध्ये उभारल्या व त्यातून ग्रामीण भागात शेतकऱ्यांवर होणाऱ्या जुलमांना वाचा फोडली, तशा स्वरूपाचे काहीच काम या ग्रामसभांनी केले नाही. या काळात नेहरू उत्तर प्रदेशातील (त्या काळचा संयुक्त प्रांत) काँग्रेसचे सरचिटणीस होते. पण त्यांनी काँग्रेसच्या मार्फत गावागावांतून साक्षरताप्रसार करण्याची किंवा सहकारी संस्था काढण्याची मोहीमदेखील हाती घेतली नाही. सत्तेचे विकेंद्रीकरण करावे, पंचायतींना अधिकार व निधी द्यावा, असे विचार त्यांनी मांडले व त्याच विचारांची अंमलबजावणी स्वातंत्र्यानंतर करण्याचा प्रयत्न त्यांनी केला.

वीस ते तीसच्या दशकात नेहरूंनी १८ व्या शतकातील युरोपीय विचारवंतांचा अभ्यास केला व त्यांना हे पटले की, शिक्षण देऊन व चांगले कायदे करून माणसाला परिपूर्णता मिळवून देता येते. त्यानंतर जे अनुभव आले, त्यामुळे या बाबतीतील नेहरूंचा आशावाद काही प्रमाणात कोमेजून गेला; तरी हे विचार त्यांच्या मनात घर करून राहिले. त्यामुळेच समकालीन हिंदी समाज कितीही बकाल व अज्ञानी असला, तरी त्याच्यातूनच एक सुशिक्षित, विवेकी व भविष्याकडे आशेने पाहणारा समाज घडवता येईल, अशी उमेद त्यांनी धरली. आधुनिकता, औद्योगिकीकरण व वैज्ञानिक विचारांविषयीची आस्था यांचे बीजारोपण समाजात झाले पाहिजे, असा आग्रह त्यांनी धरला, तो असा विवेकी समाज घडविण्याची ती साधने आहेत, अशी खात्री त्यांना वाटत होती. म्हणूनच.

(२)

एकोणीसशे सतरा साली रशियात साम्यवादी राज्यक्रांती झाली व एका विशिष्ट आणि सर्वंकष तत्त्वज्ञानावर आधारलेली सर्वांगीण पुनर्रचना करण्याची प्रतिज्ञा घेतलेले सरकार सुरू झाले. साहजिकच हिंदुस्थानातही या नवीन प्रयोगाविषयी फार मोठी उत्सुकता, कुतूहल व कौतुक निर्माण झाले. एकोणीसशे सव्वीस व सत्तावीस ही दोन वर्षे नेहरू पितापुत्र युरोपच्या सहलीला गेले होते. ब्रुसेल्स येथे नोव्हेंबर १९२७ मध्ये 'दडपलेल्या समाजांची महासभा' (ऑप्रेस्ड पीपल्स काँग्रेस) भरली होती. ह्या महासभेवर समाजवादी व साम्यवादी विचारांच्या लोकांचे वर्चस्व होते, तरी त्यांनी रोमां रोलां (१८६६-१९४४), आईन्स्टाईन (१८७९-१९५५) व मॅाँग क्विंगलिंग (१८९२-१९८१, चीनचे पुढारी सन्यत् सेन यांची पत्नी) अशा मानवतावादी

विचारवंतांनाही बोलावले होते. या महासभेला काँग्रेसचे प्रतिनिधी म्हणून जवाहरलाल नेहरू हजर होते व महासभेच्या कामकाजात त्यांनी हिरिरीने भाग घेतला.

महासभेतील चर्चेतून ब्रिटिश साम्राज्यवादाला तोंड देण्याचे वेगळे धोरण नेहरूंनी तयार केले. साम्राज्यवादाला असलेला त्यांचा विरोध, आजवर, केवळ परकीयांच्या जुलमी राजवटीला उखडले पाहिजे, या विचारातून आला होता. आता मात्र साम्राज्यवाद ही एक औरस-चौरस विचारसरणी आहे; परकी राजवटीने अंकित राष्ट्रात/ समाजात राजकीय व आर्थिक हितसंबंध निर्माण केलेले असतात; भांडवलवाद व साम्राज्यवाद यांच्यात निकटचे नाते असते, त्यामुळे साम्राज्यवादाशी द्यावयाचा लढा एकट्या हिंदुस्थानाचा नाही, तर तो जगातील सर्व गुलाम समाजांनी एकत्र येऊन साऱ्याच वर्चस्ववादी समाजांविरुद्ध करावयाचा लढा आहे; तसेच परकी राजवटीपासून मुक्ती इतके मर्यादित रूप स्वातंत्र्याच्या संकल्पनेचे असून चालत नाही; 'स्वातंत्र्य' या संकल्पनेला महत्त्वाचे आर्थिक आयाम आहेत, अशी त्यांची धारणा झाली.

नेहरूंच्या या युरोपच्या दौऱ्यातच त्यांची निरनिराळ्या युरोपियन देशांतील डाव्या व साम्यवादी चळवळींच्या नेत्यांशी व त्यांच्या विचारांशी ओळख झाली. एकोणीसशे सव्वीस सालातील बर्लिन शहर अशा चळवळीच्या नेत्यांचे आश्रयस्थानच बनून राहिले होते. बर्लिनमध्येच नेहरूंची सरोजिनी नायडू यांचे बंधू वीरेंद्र चट्टोपाध्याय व त्यांची मैत्रीण ॲग्नेस स्मेड्ली यांच्याशी गाठ पडली. या दोघांशी नेहरूंचा पत्रव्यवहार दीर्घकाळ चालला होता. स्मेड्लीबाईंनी पुढे चिनी कम्युनिस्ट पक्षाच्या चळवळीत भाग घेतला. नेहरूंना चीनमधील राजकीय हालचालींचे आकर्षण होतेच. या पत्रव्यवहारातून ते दृढ होत गेले. नोव्हेंबर १९२७मध्ये जर्मनीतील रशियन राजदूताने नेहरू पितापुत्रांना रशियाला (सोव्हिएट युनियन) येण्याचे आमंत्रण दिले. त्या वेळी साम्यवादी राज्यक्रांतीला दहा वर्षे पुरी होत होती. रशियाच्या या भेटीमुळे जवाहरलाल नेहरू यांच्या मनावर योजनाबद्ध विकासाचे महत्त्व बिंबले.

स्मेड्लीबाईंकडून नेहरूंना चीनमधील कम्युनिस्ट चळवळीची माहिती कळत होती. त्या वेळी चीनमध्ये कोमिंटांग नावाचा राष्ट्रवादी पक्ष सत्तेवर होता व कम्युनिस्ट पक्ष हा कोमिंटांगचा घटक म्हणून वावरत होता. तथापि, नेहरूंना खात्री वाटत होती की, अखेरीस कोमिंटांगला हरवून कम्युनिस्ट पक्षच पुढे सरसावेल आणि चीनचा भाग्यविधाता बनेल. त्या काळी (१९२६-२७ साली) जरी स्टालिनचे दूत चिनी कम्युनिस्ट पक्षावर पगडा ठेवून होते, तरी नेहरूंना असे वाटत होते की, भविष्यकाळात चीनमधील स्वदेशी साम्यवादच उभारीला येईल. अशा तऱ्हेचा स्वदेशी साम्यवादी पक्ष सत्तेवर आल्यावर सोव्हिएट युनियनशी दोस्ती करून राहील आणि या दोन्ही राष्ट्रांची आघाडी भांडवलवादी युरोपीय व अमेरिकन राष्ट्रांच्या आघाडीला तोंड देईल.

युरोपातील डाव्या व साम्यवादी विचारसरणींशी गाढ परिचय झाल्यानंतर नेहरू जागतिक राजकारणाचा विचार करताना राष्ट्र या संकल्पनेपेक्षा 'व्यवस्था' या संकल्पनेवर जास्त भर देऊ लागले. तीस सालाच्या सुमारास जगात एका अंगाला साम्राज्यवादी व फॅसिस्ट व्यवस्था उभ्या होत्या. या दोन्ही व्यवस्था म्हणजे खिळखिळ्या झालेल्या भांडवलदारी व्यवस्थेतून उद्भवलेल्या जुलमी व्यवस्था होत्या. त्यांच्या विरोधात राष्ट्रवादी व समाजवादी चळवळी काम करीत होत्या. त्या काळी या दोन बाजूंतील लढा स्पेन व चीन या देशांत उकळीवर आला होता. हिंदुस्थानातील स्वातंत्र्याची चळवळ हा या जागतिक लढ्याचाच भाग होता. शांततेप्रमाणेच स्वातंत्र्याचाही विचार आपल्याला तुकड्या-तुकड्यांनी करून चालत नाही. जगातील कोणताही भाग परतंत्र झाला असेल, तर ते पारतंत्र्य जगातील स्वातंत्र्याला (म्हणजे स्वातंत्र्यवाद्यांना) आव्हान आहे, असेच समजले पाहिजे.

(३)

एखाद्या व्यवस्थेचा विचार करताना त्या व्यवस्थेच्या चौकटीत जे व्यवहार चालतात, त्या व्यवहारांत काही त्रुटी, दंभ किंवा सौजन्य आणि कुरूपता किंवा सौख्य आहे का, याची चिकित्सा नेहरू प्राधान्याने करीत. त्या व्यवस्थेचा आधार असणाऱ्या तात्त्विक बैठकीत काही तर्कदोष किंवा व्याघात आहेत वा नाहीत, हे तपासणे त्यांना गौण वाटत असे. ब्रिटिश साम्राज्यवादाविरुद्ध नेहरू लढले; कारण साम्राज्याचा व्यवहार जुलमी, मनुष्याला न शोभेल असा होता. पण साम्राज्याचे जे मंडन साम्राज्य-

वादी विचारवंतांनी केले होते. (उदा. गोऱ्या लोकांनी उचललेले कर्तव्याचे ओझे.) त्याची चिरफाड त्यांनी केली नाही. भांडवलशाहीची चीड नेहरूंना येई, कारण भांडवलशाही अर्थव्यवस्थेत पिळवणूक होते, समाजाचा फार मोठा भाग दारिद्र्यात गंजत राहतो, यासाठी पण भांडवलवादाच्या चिकित्सेत ते कधी पडले नाहीत. सोव्हिएट युनियनला भेट दिल्यावर व युरोपातील डाव्या चळवळींशी जवळून संबंध आल्यावर साम्यवादी समाज हाच आदर्श होय, असे त्यांना पटले; पण साम्यवादाचा तात्त्विक आधार असणारे जे मार्क्सचे तत्त्वज्ञान त्याचा विनाहरकत स्वीकार मात्र त्यांनी केला नाही. मार्क्सच्या अनुयायांचा असा दावा होता की, मार्क्सवाद हे परिपूर्ण व तर्कशुद्ध असे सिद्धांतन आहे. नेहरूंनी ह्या दाव्याकडे काणाडोळाच केला. त्यांना असे वाटे की, वंचितांविषयी वाटलेल्या दारुण सहानुभूतीचा प्रतिभाशाली आविष्कार, हे मार्क्सवादाचे रूप आहे. आणखी असे की, नेहरूंच्या मते, मार्क्सची विचारप्रणाली भूतकाळातील घटनांची सुसंगत मांडणी करते हे बरोबर असले, तरी त्यावरून भविष्यकाळातील घटनांविषयीचे त्या मतप्रणालीचे आडाखे खरे ठरतीलच, असे नाही.

मार्क्सच्या तत्त्वज्ञानात दडपशाही आणि क्रांतिकारी हुकूमशाही या दोन कल्पनांचा पुरस्कार केला आहे. तथापि, या दोन्हींचा उपयोग करणे अपरिहार्य आहे किंवा गरजेचे आहे, असे नेहरूंना वाटत नव्हते. अशा मूलतः अस्वीकार्य मार्गांचा वापर करूनच 'आदर्श समाज' निर्माण होणार असेल, तर तो समाजही प्रत्यक्षात न आला तरी चालेल, असा त्यांचा विचार असे. जी विचारप्रणाली तात्पुरती का होईना, पण हुकूमशाही यायला हवी अशा निर्णयाप्रत येते, त्या विचारप्रणालीचा सामग्र्याने स्वीकार करण्याची नेहरूंची तयारी नव्हती. लोकशाही व समाजवाद यांचे अतूट नाते आहे; या दोन संकल्पनांपैकी कोणतीही एक संकल्पना दुसऱ्या संकल्पनेविना पांगळी होय, असा त्यांचा विश्वास होता. नागरी स्वातंत्र्ये हा समाजवादाचा अविभाज्य घटक आहे, हे त्यांच्या दृष्टीने निरपवाद सत्य होते. भांडवली अर्थव्यवस्था हे एक जगड्व्याळ यंत्र आहे व एखाद्या यंत्रातील चाके ज्याप्रमाणे अगतिकतेने फिरत असतात, त्याप्रमाणे भांडवली अर्थव्यवस्थेत अडकलेली माणसे हताशपणे ठरल्या कामात गुंतून राहतात, हे मार्क्सने रंगविलेले चित्र नेहरूंना मान्य नव्हते. भांडवली व्यवस्थेतील आर्थिक व सामाजिक बंधने व अडथळे दूर करून समाजवादी समाजरचना निर्माण करता येते व अशा समाजात व्यक्तीच्या स्वातंत्र्याला अनिर्बंध वाव असू शकतो, असे ते मानत असत.

जो प्रश्न किंवा जी परिस्थिती उद्भवेल तिचा विचार, कोणत्याही विशिष्ट मतप्रणालीची ढापणे लावून न घेता, त्या प्रश्नाचे किंवा परिस्थितीचे मूळ स्वरूप जाणून घेऊन करावा, असा नेहरूंचा कल असे. त्यामुळेच समाजवाद ही त्यांच्या दृष्टीने एक गोठलेली संकल्पना नव्हती, तर समाजवाद ही एक दिशा होती. व्याख्या आणि सिद्धान्त यांच्या जंजाळात अडकून न राहता आपल्या उद्दिष्टाकडे वाटचाल करावी, इकडे त्यांच्या बुद्धीचा ओढा असे. भारतीय कम्युनिस्ट पक्ष हा १९ व्या शतकात रचलेला मार्क्सवाद आणि सोव्हिएट युनियनने घालून दिलेला कित्ता यांच्या पलीकडे जायला तयार नाही, अशी टीका ते त्या पक्षावर करीत. भारतीय जनतेचे दारिद्र्य व अधःपतन लक्षात घेता तिचा उद्धार समाजवादाचा अवलंब करूनच घडून येईल, अशी त्यांची खात्री होती. पण त्यासाठी अनुकूल परिस्थिती निर्माण झाली पाहिजे आणि जनतेने मोठ्या बहुमताने समाजवादाला मान्यता दिली पाहिजे. कुणीतरी लोकांवर समाजवाद लादला, असे होता कामा नये, अशी त्यांची धारणा होती.

या भूमिकेचा स्वीकार केला तर ज्यांनी समाजवादाचा वसा घेतलेला आहे, अशा लोकांनी काय करावे, असा उलगडा होतो. समाजवादाचा प्रचार करावा, समाजवादाच्या तत्त्वज्ञानाचे शिक्षण लोकांना द्यावे व देशातील जनतेच्या मोठ्या हिश्श्याचा पाठिंबा समाजवादाला मिळवून द्यावा. स्वातंत्र्य मिळाल्यानंतरदेखील राज्यकर्त्यांनी लोकांवर समाजवाद लादता कामाचा नाही. जे जे प्रश्न उद्भवतील, त्यांच्या बाबतीत लोकांना शिकवण देऊन त्या प्रश्नांचा समाजवादाला अनुकूल असा निर्णय होईल, अशी दक्षता घ्यावी. असे झाले की, समस्या सोडवता सोडवता बहुसंख्य लोकांच्या पाठिंब्याने आदर्श समाजवादी रचना प्रत्यक्षात येईल व तसे होताना कमीत कमी लोक दुखावले जातील.

या भूमिकेचा अर्थ असा नाही, की वर्गलढा आणि अंती रयतेचाच जय होईल, हा मार्क्सचा सिद्धान्त यांना समाजवाद्यांनी रामराम ठोकावा; लोकशाही मार्गाने समाजवादाकडे जाताना वर्गलढ्याची तीव्रता सौम्य करता येईल, हा विवेकी आशावाद या भूमिकेत अनुस्यूत होता.

ह्या भूमिकेत मूलतःच काही घोटाळा आहे, अशी टीका वारंवार झालेली आहे. लोकशाही समाजवाद्यांना वाटते की, लोकशाही व समाजवाद वेगळे काढता येत नाहीत. नेहरूंचेही तेच म्हणणे होते. याउलट, कट्टर साम्यवादी सांगत आले की, लोकशाही आणि समाजवाद या परस्परविरोधी संकल्पना आहेत व लोकशाही समाजवाद हे 'ठेविले अनंते तैसेचि राहावे' या ब्रीदाला दिलेले गोंडस नाव आहे. कट्टर साम्यवादी लोकांचे ठाम म्हणणे असते की, मार्क्सवाद व अधिकारशाही (ऑथॉरिटेरियानिझम्) हे जोडीनेच वावरत असतात. तुम्ही नुसता मार्क्सवाद उचललात व अधिकारशाही बाजूला ठेवलीत, तर केवळ एक गोंडस देखावा निर्माण होईल. त्यात तथ्य–म्हणजे समाजवाद–असणार नाही.

(४)

एकोणीसशे एकोणतीस साली नेहरू काँग्रेसचे अध्यक्ष झाले. त्या लाहोरच्या काँग्रेसमध्येच 'पूर्ण स्वातंत्र्या'चा ठराव मंजूर झाला. अध्यक्षीय भाषणात नेहरूंनी आपले समाजवादी विचार आणि स्वातंत्र्यलढ्याचे व्यापक आकलन यांचा ऊहापोह केला. तीस ते चाळीस या दशकात नेहरू व गांधींचे अनुयायी यांच्यात नेहरूंच्या डाव्या विचारांवरून अनेकदा मतभेद झाले. त्यामुळे समाजवादाच्या संबंधात गांधी व नेहरू यांच्या भूमिका काय होत्या, याचा विचार केला पाहिजे.

नेहरू लोकशाही समाजवादी होते. त्यांनी मार्क्सवाद पूर्णपणे स्वीकारलेला नव्हता, हे आपण पाहिलेच. पण मनुष्याच्या इतिहासाला विशिष्ट दिशा आहे व समाजाच्या परिवर्तनाचे काही नियम असतात, हे नेहरूंनी मान्य केले होते. तथापि, या दोन्ही गोष्टी गांधींना अमान्य होत्या. वर्गलढा ही कल्पना नेहरूंना मान्य होती; पण हिंसा किंवा क्रांती या मार्गांनी वर्गलढा न लढवता लोकशाही मार्गाने कायदे करून दडपलेल्या वर्गांना न्याय मिळवून द्यावा, अशी नेहरूंची भूमिका होती. गांधींना वर्गलढा ही कल्पनाच विचित्र वाटत असे. धनिक लोक हे समाजाचा पैसा विश्वस्त म्हणून आपल्याकडे ठेवतात व त्याच अधिकाराने त्यांनी तो पैसा समाजाच्या कल्याणासाठी वापरायचा असतो, असा गांधींचा विचार होता. मालक व मजूर, जमीनदार व कुळे, सावकार व कर्जदार यांच्यांतील झगडे सोडवताना समाजवादाचे पाऊल पुढे पडेल, असे धोरण अवलंबावे इकडे नेहरूंचा कल होता. तर उत्तर-प्रदेशात जेव्हा जेव्हा शेतकऱ्यांनी जमीनदारांविरुद्ध लढे उभारले, तेव्हा गांधींनी त्या लढ्यांना उत्तेजन तर दिले नाहीच; पण वाटाघाटी होताना जमिनदारांनाच झुकते माप दिले.

असा विरोध येत असल्याने गांधींचे नेतृत्व झुगारून आपण स्वतंत्र मार्ग पतकरावा असा विचार नेहरूंच्या मनात वारंवार येई. पण प्रत्यक्षात नेहरूंनी तसे कधी केले नाही, हा इतिहास आहे. नेहरूंच्या काही सहकाऱ्यांनी आडपडद्याने असे सुचविले आहे की, गांधींचा वारसा आपल्याकडे येईल व त्यातून सत्ता, अधिकार, गौरव व लोकप्रियता मिळेल या स्वार्थी विचाराने कोंडमारा होत असताही नेहरू गांधींचे अनुयायित्व पतकरून राहिले. गांधी-नेहरू संबंधांचा आधार ह्या स्वार्थी विचारात होता, हे स्वीकारले तरी त्या संबंधांचे काही अधिक मनोज्ञ पैलू होते, इकडे दुर्लक्ष करून चालणार नाही.

नेहरूंना हे मनोमन पटले होते की, समाजवादाची परिणती शोषणमुक्त समाजाचे अवतरण होण्यात होते व गांधींनाही शोषणमुक्त समाजच हवा होता. प्रचलित अर्थव्यवस्थेच्या चौकटीत गांधींचा व्यवहार हा बऱ्याचदा शोषितांच्या विरोधात गेला तरी दोघांचे अंतिम उद्दिष्ट तेच आहे, हे नेहरूंना उमगले होते. दुसरे असे की, भारताचे स्वातंत्र्य हा समाजवादाकडील वाटचालीचा महत्त्वाचा टप्पा होता आणि स्वातंत्र्याचा लढा गांधींच्या नेतृत्वाखालीच लढला जाऊ शकतो, याविषयी नेहरूंची खात्री होती. तिसरी गोष्ट अशी की, शोषितांविषयी नेहरूंना वाटणारी जवळीक ही समाजवादी विचारांच्या पातळीवरून वाटत होती, तर गांधी व गरीब हिंदी जनता यांच्यांत आत्मिक नाते होते. म्हणजेच गांधींना शोषितांविषयी वाटणारी आत्मीयता स्वाभाविक होती, तर नेहरूंना गरिबांविषयी वाटणारी कणव ही बौद्धिक व कृत्रिम होती.

अनुक्रमणिका






गांधींची ह्या बाबतीतील श्रेष्ठता नेहरूंनी विनयपूर्वक स्वीकारली होती.

स्वातंत्र्यपूर्व काळात गांधींचे नेतृत्व जेवढे मोलाचे होते, तेवढेच मोल काँग्रेस संघटनेलाही होते. ब्रिटिशांकडून सत्ता मिळविण्यासाठी काँग्रेस ही एकमेव संघटना उपयोगी येणार होती. त्यामुळे पोथीनिष्ठ समाजवादाची पोपटपंची करून स्वत:ला संघटनेत एकाकी करून घेणे किंवा समाजवादी अनुयायांना बरोबर घेऊन व काँग्रेसबाहेरील साम्यवादी गटांना समाविष्ट करून घेऊन वेगळा पक्ष काढणे, या दोन्ही गोष्टी नेहरूंना शहाणपणाच्या वाटल्या नाहीत. त्यापेक्षा आर्थिक प्रश्नांविषयी काँग्रेसच्या कार्यकर्त्यांना शिक्षण द्यावे आणि हळूहळू काँग्रेसमधील प्रागतिक विचारांना जोर आणावा, ही नीतीच नेहरूंनी स्वीकारली. नेहरूंचे अंतिम उद्दिष्ट समाजवाद हेच होते व समाजवादी समाजरचनेचे चित्र त्यांच्या मनश्चक्षूंसमोर तरळत होते, तरी काँग्रेसमधील मध्यमवर्गीय कार्यकर्त्यांना डिवचणारी समाजवादी मते मांडण्याचा अगोचरपणा त्यांनी केला नाही. प्रत्येक वेळी एकच आखडते पाऊल पण योग्य दिशेने पडत राहील, याची काळजी त्यांनी घेतली. उदा., १९२८ साली त्यांनी असे मत मांडले की, सरकारने हळूहळू महत्त्वाचे उद्योग ताब्यात घ्यावेत, कामगारांना पोटापाण्यापुरता तरी पगार मिळाला पाहिजे याची दक्षता घ्यावी व कर वाढवावेत. मात्र जामीनदारीविषयी बोलताना त्यांनी आवर्जून सांगितले, की जमीनदारांना काही प्रमाणात मोबदला देऊन त्यांची जमीन लहान जमीनमालकांत वाटून द्यावी. या वाटेकऱ्यांनी त्यांची जमीन विकता कामा नये. (किंवा दुसऱ्या कोणाला ती जमीन विकत घेता येऊ नये.) सरकारने जमीन ताब्यात घ्यावी व स्वतः शेती करावी, असा विचार त्यांनी मांडला नाही. सरकारने आदर्श शेतीचा नमुना म्हणून काही शेती सांभाळावी, असे त्यांनी सुचविले. १९२९ साली नेहरूंनी असा विचार मांडला, की देशातील गरिबी आणि दु:ख यांना परकीय सत्तेकडून होणारे शोषण हे तर कारणीभूत आहेच, पण अर्थरचनाही कारणीभूत आहे; त्यामुळे 'क्रांतिकारक बदल' घडवून आणावे लागतील. ही भाषा, खरेतर, काँग्रेसला पचण्यासारखी नव्हती. पण ज्यांनी तो ठराव मंजूर केला त्यांना वाटले असावे की, नेहरूंच्या हाती काँग्रेसची सूत्रे असताना या बाबतीत फारशी काळजी बाळगायचे कारण नाही! खेरीज स्वराज्य अजून बरेच दूर होते.

एकोणीसशे तीस साली उत्तर प्रदेशातील (तेव्हाचा संयुक्त प्रांत) जमीनदारी मोडीत काढण्याची एक क्रांतिकारी योजना नेहरूंनी मांडली. मोठमोठ्या जमीनदारांच्या जमिनी ताब्यात घेऊन त्या खंडकरी शेतकऱ्यांच्या मालकीच्या कराव्यात व काही जमिनींवर विस्तृत सरकारी कृषिक्षेत्रे (फार्म्स) तयार करावेत. शेतकऱ्यांनी किती खंड जमीनमालकाला द्यावा यावर मर्यादा घालावी. खंडकरी शेतकऱ्यांचे हक्क वाढवून द्यावेत आणि श्रीमंत शेतकऱ्यांवरील साऱ्याचा दर चढता ठेवावा, अशा तरतुदी या योजनेत होत्या. त्याला वर्गलढ्याचा वास येत असला व या योजनेमुळे जमीनमालक व कुळे यांच्यात चकमकी झडू लागल्या तरी ती जोखीमही पतकरली पाहिजे, असा नेहरूंचा आग्रह होता. जिथे झगडा अपरिहार्य आहे, तिथे त्याचीही तयारी ठेवली पाहिजे. वर्गलढा ओढवून घेऊ नये, हे काँग्रेसचे धोरण योग्यच आहे; पण 'वर्गलढा नको' असे म्हटल्याने तो टळतो असे होत नाही. जेव्हा जमीनदार व कुळे, उद्योगपती व कामगार तसेच जमीनधारक विरुद्ध बिगरजमीनधारक अशा प्रकारचे लढे होतील तेव्हा काँग्रेसने वंचितांची बाजूच घेतली पाहिजे, असे नेहरूंचे प्रतिपादन होते. अर्थात वरील योजना व विचार नेहरूंनी स्वत:चे व्यक्तिगत विचार म्हणून मांडले होते.

पण काँग्रेसने जी योजना स्वीकारावी व जिच्यासाठी कार्य करावे, अशी योजना तयार करताना नेहरू अतिशय सौम्य शब्दरचना करीत व त्यांनी मांडलेले धोरणही काँग्रेसला परवडेल अशा पद्धतीचे असे. १९३१ च्या कराची येथील काँग्रेसमध्ये त्यांनी मूलभूत हक्कांचा ठराव मांडला. त्यात काहीही लोकविलक्षण किंवा समाजवादी म्हणता येतील अशा गोष्टी सुचविल्या नव्हत्या. कामगारांना पोटापुरते वेतन मिळावे, कामाच्या ठिकाणी योग्य सोयी असाव्यात, मालक विरुद्ध कामगार अशा झगड्यात लवाद नेमण्याची तरतूद करावी आणि खाणी व इतर कळीचे उद्योग यांच्यावर सरकारी नियंत्रण असावे, असा त्याचा आशय होता. शेतीच्या बाबतीत बोलायचे, तर ह्या

अनुक्रमणिका






ठरावात जमीनदारी संपविण्याचा किंवा जमीन समाजाच्या मालकीची करण्याचा उल्लेखही नव्हता व ग्रामीण भागातील कर्जे निकालात काढण्याची सूचनाही नव्हती. या ठरावाने काँग्रेसने समाजवादाच्या दिशेने कोणतीच प्रगती केली नव्हती; पण नेहरूंचे गौण उद्दिष्ट जे होते की, काँग्रेसला काही आर्थिक धोरण हवे, त्या धोरणाचे काहीसे उद्घाटन नेहरूंनी केले होते.

तीस ते चाळीस या दशकाच्या अखेरीस नेहरूंनी काँग्रेसच्या वर्तुळात आर्थिक नियोजनाचा विचार व भाषा रुजविली. आर्थिक नियोजन हा समाजवादाचाच एक भाग आहे. लोकशाही राज्यात समाजवादी अर्थरचना आणायची असेल, तर नियोजन हे महत्त्वाचे साधन आहे. याही बाबतीत नेहरूंनी अगदी किमान अशी अपेक्षा बाळगली होती. ती अशी की, नियोजनाच्या निमित्ताने काँग्रेसमध्ये व मध्यमवर्गीयात समाजवादी संकल्पना व शब्द यांचा नकळत वापर सुरू होईल. त्यांनी काँग्रेस-मध्येच एक नियोजन समिती स्थापन केली. तीवर काही भांडवलदार, काही अर्थतज्ज्ञ, काही विचारवंत अशी नावाजलेली माणसे घेतली. नियोजनाची उद्दिष्टेही अगदी ढोबळ स्वरूपात उल्लेखिलेली होती. उदा., लोकशाही स्वातंत्र्य, संधीची समानता, जीवनमानात सुधारणा, विषमता दूर करणे इत्यादी. या समितीवरील सदस्यांनाही त्यांनी मतस्वातंत्र्य दिले व ताबडतोब ज्या गोष्टी घडवून आणायला हव्यात, त्यांच्याविषयी अहवाल तयार करायला सांगितले.

आर्थिक उद्दिष्टांवर भर दिल्यामुळे त्या काळी हिंदू-मुस्लिम दंगली व बेबनाव यांचा जो बुजबुजाट झाला होता, त्यावरून लोकांचे लक्ष उडेल अशीही नेहरूंची अपेक्षा होती. मुसलमान हे अल्पसंख्याक, अशिक्षित व आर्थिक दृष्ट्या मागासलेले असल्याने अधिक सामर्थ्यवान अशा हिंदूंनी आपल्याला घेरले आहे, असे त्यांना वाटते व अशा स्थितीत त्यांनी धार्मिक पायावर संघटना बांधल्या, तर नेहरूंना वैषम्य वाटत नसे. मुसलमानांना वाटणारी भीती दूर केली तर त्यांच्यातील कडवेपणा नाहीसा होईल, असा त्यांना विश्वास वाटे. याउलट, हिंदूंचा जातीयवाद हा प्रतिगामी स्वरूपाचा आहे, असे त्यांचे मत होते. मध्ययुगातील हिंदु-मुसलमानांचे वैर पुढील काळातही ओढण्याचा हा प्रयत्न आहे, असे त्यांना वाटे. गरिबी, भुकेकंगालपणा या गोष्टी हिंदू व मुसलमान या दोघांनाही भोवत आहेत. जर ही दु:खे कमी केली, तर जातीय राजकारण संपेल, असा त्यांचा होरा होता.

नेहरूंच्या मनाची घडण अशा विविध पैलूंनी बनली होती. समाजवादाची त्यांना ओढ होती, गांधी व काँग्रेस यांच्यावर त्यांची निष्ठा होती, आर्थिक नियोजनावर त्यांचा भर होता, देशातील प्रश्नांकडे केवळ राष्ट्रवादी दृष्टि-कोणातून न बघता जागतिक संघर्षात भाग घेणाऱ्या विविध व्यवस्थांच्या संदर्भात त्या प्रश्नांचा खल करावा, अशी त्यांना सवय होती. ते मार्क्सवादी होते, पण मार्क्सवादाने पुरस्कारलेला विरोधी विचार दडपून टाकण्याचा सोस त्यांना आवडत नसे. ते समाजवादासाठी नागरी स्वातंत्र्ये गमावण्यास तयार नव्हते. आमूलाग्र बदल घडवून आणण्याचा त्यांचा आग्रह होता; पण त्यासाठी हिंसेची कास धरावी लागते, हे त्यांना मान्य नव्हते. आंतरराष्ट्रीय राजकीय प्रवाहांची त्यांना सखोल जाण होती, पण तरी देशावरील त्यांची निष्ठा वादातीत होती. प्रगतीचा वेग मंदावला तरी चालेल, पण साऱ्या लोकांना आपण बरोबर घेऊन जाणार आहोत, हा त्यांचा ध्यास होता.

---

१. २७ मे रोजी जवाहरलाल नेहरूंचा ४९ वा मृत्युदिन आहे.

२. के. एन्. पणिक्कर (संपादक) : नॅशनल ॲण्ड लेफ्ट मुव्हमेंट्स इन इंडिया, विकास पब्लिशिंग हाउस प्रायव्हेट लिमिटेड, न्यू दिल्ली, १९८०.

☆☆☆

अनुक्रमणिका

# मानवी मनाचे शिक्षण व विकास

## The Development and Education of Mind

## The Selected works of Howard Gardner

प्रा. रमेश पानसे




**हॉवर्ड गार्डनर (१९४३)**

मानवी समाज वृद्धिंगत होण्यानेच शिक्षणाचे स्वतःचे समर्थन होऊ शकते.

- हॉवर्ड गार्डनर, इंटलिजन्स रिफ्रेम्ड, (१९९९), पा. क्र. १७८.

मानसशास्त्रज्ञ हॉवर्ड गार्डनर हे, अलीकडेच गाजलेल्या आणि आजच्या व उद्याच्या शिक्षणावर प्रभाव टाकणाऱ्या 'बहुविध बुद्धिमत्तेच्या सिद्धांता'चे जनक आहेत. त्यांचा 'फ्रेम्स ऑव्ह माइंड : द थिअरी ऑव्ह मल्टिपल इंटलिजन्सेस' हा ग्रंथ १९८३ साली प्रसिद्ध झाला आणि तो थोड्याच अवधीत जगभर गाजला. मानसशास्त्रीय क्षेत्रातील या ग्रंथाचे दमदार स्वागत झाले, ते प्रामुख्याने शिक्षणाच्या क्षेत्रात. बुद्धिमत्ता ही एक सर्वसाधारण अशी क्षमता नसून, बुद्धिमत्ता या अनेक असतात, अशी भूमिका घेणारा हा सिद्धांत शिक्षणक्षेत्रातील अनेकांना, अनेक अंगांनी उपयुक्त वाटला. मुले एकाच प्रकारे नव्हे, तर भिन्न प्रकारांनी विचार करतात, हे सत्य अनेक शिक्षकांना आणि शिक्षणक्षेत्रातील विचारवंतांना जाणवत होतेच; फक्त या सिद्धांताची कारणमीमांसा होऊ शकली. त्यामुळेच, आज अनेक देशांमधून बहुविध बुद्धिमत्तेच्या विचाराच्या आधारावर शिक्षणाच्या नव्या रचनांची मांडणी शिक्षणक्षेत्रात होऊ लागली आहे.

हॉवर्ड गार्डनर यांच्या नावावर आज वीसपेक्षा अधिक ग्रंथ व शेकडो लेख आहेत. त्यांपैकी बुद्धिमत्तेबाबत नवा सिद्धांत देणाऱ्या 'फ्रेम्स ऑव्ह माइंड' या ग्रंथाबरोबरच, 'द माइंडस् न्यू सायन्स : अ हिस्ट्री ऑव्ह द कॉग्निटिव्ह रेव्होल्युशन' हा १९८५ सालचा ग्रंथ, 'मल्टिपल इंटलिजन्सेस' (१९९३), 'इंटलिजन्स रिफ्रेम्ड' (१९९९), 'द डिसप्लिन्ड माइंड' (२०००), 'गुडवर्क' (२००१) हेही तज्ज्ञजनांमध्ये मान्यताप्राप्त असे ग्रंथ आहेत. गार्डनर यांच्या अशा शेकडो पानांच्या एकूण ग्रंथ-लेखनसंपदेतून निवडक पण प्रातिनिधिक लेखनाचे पुस्तक तयार करणे, हे मोठे जिकिरीचे काम आहे.

'द डिव्हलपमेंट अँड एज्युकेशन ऑव्ह द माइंड' हा हॉवर्ड गार्डनर यांच्या निवडक लेखनाचा संग्रह (पृष्ठसंख्या १० + २६९), २००६ साली प्रकाशित झाला आहे.

हॉवर्ड गार्डनर यांच्या विविधांगी लेखनाला समाविष्ट करून घेण्यासाठी या पुस्तकात लेखनाचे पाच विभाग केले आहेत. पहिल्या विभागात, गार्डनर यांच्यावर प्रभाव पाडणाऱ्या शास्त्रज्ञांची व्यक्तिचित्रे व विचारचित्रे रेखाटणारे त्यांचे पाच लेख आहेत. दुसरा विभाग हा केवळ बहुविध बुद्धिमत्तेच्या सिद्धांताच्या संदर्भातील सहा वेगवेगळ्या लेखांनी सजला आहे. तिसरा विभाग हा 'कला शिक्षण' या विषयाला वाहिलेला असून त्यात गार्डनर यांचे चार महत्त्वाचे लेख देण्यात आले आहेत. शिक्षणातून घडणारी विद्यार्थ्यांची समज या विषयाचा ऊहापोह करणारे तीन लेख चौथ्या विभागात देण्यात आले असून पाचव्या विभागात असलेल्या पाच लेखांमधून गार्डनर यांनी शिक्षणाचा भावी कालाशी बांधलेला संबंध स्पष्ट झाला आहे. अशा प्रकारे गार्डनर यांचे २३ लेख आणि त्यांच्याविषयीचा मिंडी कोर्नहेबर यांनी लिहिलेला सुरवातीचा चरित्रात्मक लेख अशी ही ग्रंथबद्ध लेखसंपदा आहे. गार्डनर यांचे लेखन नेहमीच नेमके तरीही रसाळ आणि वैचारिक तरीही आकर्षक अशा स्वरूपाचे असते, ह्याचा प्रत्यय याही ग्रंथात येतो.

**व्यक्तिचित्रे**

ज्यॉं पियाजे (Jean Piaget) हा हॉवर्ड गार्डनरच्या आधीच्या पिढीचा, जनुकीय ज्ञानशास्त्राचा (Genetic

Epistemology) जनक. बालकाच्या शारीरिक विकासाच्या संदर्भात ज्ञानाच्या बदलत्या आकृतिबंधाची दिलेली जाण हे पियाजेचे मोठे योगदान आहे. बालकाच्या मनाचे पियाजेने मांडलेले चित्र, हे माणसाच्या व्यक्तिमत्त्वाबाबतच्या फ्राईडच्या मर्मदृष्टीइतकेच थोर आहे, असे गार्डनरने म्हटले आहे. याच पिढीच्या जेरोम ब्रुनर (Jerome Bruner) या मानसशास्त्रज्ञाचा प्रत्यक्षपणे प्रभाव गार्डनरवर होता; कारण, आपण स्वीकारलेला (मानसशास्त्रज्ञाचा) पेशा हा ब्रुनरच्या उदाहरणावरूनच घेतला होता, असे स्वतः गार्डनर यांनी म्हटले आहे. ब्रुनरचे मोठे योगदान म्हणजे, त्याने असे दाखवून दिले, की मुले आपल्या अनुभवांचे रूपांतर ज्ञानात करताना ते अनुक्रमे तीन पायऱ्या चढून जातात. एक, प्रत्यक्ष कृती, दोन, भाषेचा वापर करून प्रतिमानिर्मिती आणि ती, विविध प्रतीकव्यवस्था. अमेरिकन तत्त्वज्ञ नेलसन गुडमन (Nelson Goodman) यांनी नेतृत्व केलेल्या 'प्रॉजेक्ट झीरो' या संशोधन प्रकल्पामध्ये, त्यांच्याबरोबर प्रत्यक्ष कामाचा अनुभव घेऊनच गार्डनर यांची वैचारिक प्रगती झालेली आहे. या प्रकल्पाचा अहवालरूप आढावा घेणाऱ्या 'फ्रेम्स ऑव्ह माइंड' या ग्रंथाने, गार्डनर यांनी आपला बहुविध बुद्धिमत्तांचा सिद्धांत पुढे आणला आहे. 'एखाद्याला अधिक सर्जनशील बनण्यासाठी काय मदत करता येईल?' या विषयावरील गप्पांमध्ये आलेल्या अनेक सूचनांना डावलून नेलसन गुडमन यांनी सुचविले की, "अडचणी निर्माण करा, आणि त्याही उत्पादक स्वरूपाच्या असल्या पाहिजेत!" गार्डनर यांनी दिलेली ही आठवण शिक्षणात काम करणाऱ्यांना खूपच उपयोगी आहे. नॉर्मन गेशविंड (Norman Geschwind) हे अमेरिकेतील एक सर्जनशील मज्जामानसशास्त्रज्ञ. 'मेशविंड यांची प्रयोगशाळा ही त्यांच्या डोक्यातच स्थापन झाली होती', असे त्यांच्याबद्दल अँटोनिओ डमॅशिओ (Antonio Damasio) यांनी म्हटले आहे. गेशविंड यांचे केवळ एक भाषण ऐकून गार्डनर इतके प्रभावित झाले, की त्यांनी, गेशविंड यांचे वैचारिक शिष्यत्व पतकरले व आपला पोस्ट डॉक्टरल अभ्यास त्यांच्या हाताखाली केला. त्यांचे मेंदूतील विकृती आणि मज्जामानसशास्त्रीय आजारांबाबतचे संशोधन विशेष महत्त्वाचे असल्याचे, गार्डनर यांनी या ग्रंथात सांगितले आहे.

आपल्यावर आणि आपल्या कार्यावर वैचारिक परिणाम करणाऱ्या या शास्त्रज्ञांची कार्यचरित्रे गार्डनर यांनी फार नेटकेपणाने या ग्रंथाच्या पहिल्या भागात मांडली आहेत. याचबरोबर एक महत्त्वाचा, विशेषतः अभ्यासकांना उपयोगी ठरेल, असा एक लेख या विभागात आहे. पियाजेचे विकासक मानसशास्त्रातील कार्य हा एक मैलाचा दगड असला, तरी त्याच्यानंतरच्या गेल्या पन्नास-साठ वर्षांमध्ये या शास्त्रात झालेल्या प्रगतीचा आढावा, गार्डनर यांनी घेतला आहे. यामध्ये विशेष भर दिला आहे तो 'प्रतीकव्यवस्था दृष्टिकोण' (Symbolization Approach) या नव्या विचारावर. कारण, मुलांच्या आकलनविषयक अभ्यासक्षेत्रामध्ये या प्रतीकक्षमतांचा अभ्यास किंवा त्यांच्या विकासाचा अभ्यास महत्त्वाचा ठरणारा आहे.

**बहुविध बुद्धिमत्ता**

या ग्रंथातील दुसरा सहा लेखांचा भाग हा, ज्यासाठी गार्डनर यांचे नाव जगभर प्रसिद्ध झाले आहे, त्या त्यांच्या बहुविध बुद्धिमत्तांच्या सिद्धांताबाबतचा आहे. नव्यानेच हे लेख वाचणारांना गार्डनर यांच्या या सिद्धांताची नेमकी आणि सविस्तर माहिती आपोआपच होईल, अशा रीतीने या लेखांची निवड करण्यात आली आहे. यांमधील पहिला म्हणजे 'बियाँड द आय् क्यू' हा आणि शेवटचा 'एम् आय् आफ्टर २० इयर्स' हे दोन लेख मला अधिक महत्त्वाचे वाटतात. मुलांचे शिक्षण व मानवी विकास या अंगाने विचार करता, शतकभर प्रभाव पाडून असलेला बुद्धिमत्तेविषयीचा एकांगी विचार व बुद्ध्यंकाची संकल्पना यांनी शैक्षणिक आणि विकासात्मक प्रयत्नांना जणू संकुचितताच आणली होती. शिक्षणात विशिष्ट प्रकारच्या बुद्धिमत्तेला आलेले अवास्तव महत्त्व व बुद्धिमत्तेची आनुवंशिकतेशी घातलेली सांगड यांनी फार मोठी शैक्षणिक नि सामाजिक विषमताच जोपासली आहे. त्यामुळे त्यांना या लेखात नेमकेपणाने छेद देण्यात आला आहे. बुद्धिमत्तेविषयीच्या पूर्वग्रहातून आपल्याला बाहेर काढण्याचे कार्य हा लेख करतो, म्हणून तो मला महत्त्वाचा वाटतो.

बहुविध बुद्धिमत्तेचा नवविचार प्रसारित झाल्याला २००३ साली वीस वर्षे पूर्ण झाल्यानंतर, गार्डनर यांनी

या विचाराच्या उपयुक्ततेचा, प्रसाराचा किंवा त्यात आलेल्या विकृतींचाही आढावा या लेखाद्वारे घेतला आहे. या लेखाचे एक वैशिष्ट्य असे की, या आपल्या विचाराकडेही गार्डनर यांनी दूरस्थ दृष्टिक्षेप टाकला आहे. आपण बहुविध बुद्धिमत्तांचा सिद्धांत 'निर्माण' करण्याकडे कसे वळले, बहुविध बुद्धिमत्ता (Multiple Intelligences) हा शब्दप्रयोग कसा सुचला, तो पारंपरिक बुद्धिमत्तेच्या संकल्पनेशी कसा फटकून आहे, 'बुद्धिमत्ते'ची व्याख्या नव्याने आपण कशी केली, 'बुद्धिमत्ता' ठरविणारे निकष कसे निश्चित केले गेले, तसेच, या सिद्धांताचे शैक्षणिक उपयोग कसकसे प्रत्ययाला येत गेले, या साऱ्यांची थोडक्यात शहानिशा या लेखात केली आहे. या सिद्धांताचे एक शैक्षणिक पर्यवसान असे, की त्याने खुद्द हॉवर्ड गार्डनर यांना प्रत्यक्ष शिक्षणकार्यात उतरण्यास उद्युक्त केले आहे. त्यांनी केलेले वैयक्तिक प्रयोगांचे अभ्यास, नव्या बुद्धिमत्तांचा शोध, 'स्पेक्ट्रम'सारखे शैक्षणिक प्रकल्प अशा गोष्टींचा त्यात समावेश होतो. आपल्याला पुनर्जन्म मिळाला तर या दिशेने आणखी शोध घ्यायला आवडेल, असेही लेखाच्या अखेरीस हॉवर्ड गार्डनर यांनी म्हणून ठेवले आहे.

**कला शिक्षण**

ग्रंथातील तिसऱ्या भागात 'कला शिक्षण' या विषयांशी संबंधित असे तीन लेख आहेत. 'कला' हे गार्डनर यांचे मूळचे नि आवडीचे क्षेत्र. 'लहान वयात मी एक प्रामाणिक पियानोवादक होतो आणि मला इतरही अनेक कलांत रस होता', असे स्वतःबद्दल गार्डनर यांनी याच ग्रंथात एके ठिकाणी (पान ८७) म्हटले आहे. मानसशास्त्राचा अभ्यासक झाल्यानंतर त्यांना खटकलेली गोष्ट अशी की, अमेरिकन क्रमिक पुस्तकांतून मुलांच्या कलात्मक विकासाला आणि कलात्मक बुद्धिमत्तेला काहीही स्थान दिलेले नाही. त्यामुळे, साहजिकच गार्डनर यांच्या विचारांत, बौद्धिक कार्यात व संशोधनांतही कला, कलाशिक्षण, कलांची बुद्धिमत्ता अशा विषयांना स्थान मिळत गेले. कलेचे ज्ञानक्षेत्र आणि अन्य ज्ञानक्षेत्रे यांच्या परस्परसंबंधांचाही त्यांनी शोध घेण्याचा प्रयत्न केला. नंतरच्या काळात ARTS PROPEL प्रकल्पांतर्गत, कलाशिक्षणात अभ्यासक्रम व मूल्यमापन या संदर्भात अभ्यास करण्याची संधीही गार्डनर यांना मिळाली. त्यांच्या कलाविषयक दृष्टिकोणाला आणखी एक साहाय्य झाले ते त्यांच्या चीनभेटीने. 'अमेरिका-चीन एक्सचेंज इन आर्ट्स एज्युकेशन' या प्रकल्पांतर्गत गार्डनर यांनी आपल्या कुटुंबासहित काही महिने वास्तव्य केले. त्यामुळे या विभागातील लेखांतून या साऱ्याच आचार-विचारांना स्थान मिळालेले दिसून येते.

**शिक्षणविषयक नवा दृष्टिकोण**

या ग्रंथातील चौथा भाग हा शिक्षणक्षेत्रात काम करणाऱ्यांच्या आणि पालकांच्याही दृष्टीने, आपल्या विचारांत आणि म्हणून आचारातही बदल घडवून आणणारा असा आहे. नव्या जगासाठी, नव्या काळासाठी शिक्षणविषयक नवीन दृष्टिकोण अंगीकारण्याची गरज निर्माण झाली आहे. या विभागातील तीनही लेखांतून एकत्रित रीत्या आवश्यक असा नवा दृष्टिकोण देण्याचे काम हॉवर्ड गार्डनर यांनी केले आहे. 'डिसप्लिनरी अंडरस्टँडिंग' या शीर्षकाखाली देण्यात आलेल्या लेखांचा मुख्य आशय आहे, तो शाळांतून शिकणाऱ्या मुलांची परीक्षांतून वगैरे दिसून येणारी कामगिरी महत्त्वाची नाही, तर शिकत असलेल्या विषयांची–त्यांतील संकल्पनांची–समज येणे महत्त्वाचे आहे, असे गार्डनर यांनी दाखवून दिले आहे.

'माहिती होण्याकडून' (knowing) 'समजण्या'कडे (understanding) अशी शिक्षणातील परिवर्तनाची दिशा या तीनही लेखांतून गार्डनर यांनी मांडली आहे; आणि आपल्या या भूमिकेचे सैद्धांतिक आणि व्यावहारिक अशा दोनही स्तरांवरून समर्थन केले आहे. प्रचलित शाळांमधून सर्वस्वी भर आहे तो विद्यार्थ्यांना माहिती पुरविण्यावर आणि त्याची (परीक्षांमधून) पुनरुक्ती करून घेण्यावर. यातून विद्यार्थ्यांना आपले विषय समजतातच असे नाही; किंबहुना बहुसंख्य विद्यार्थी 'अशिक्षित'च राहतात. येथेच, शिक्षणातील एका विरोधाभासाकडे गार्डनर आपले लक्ष वेधतात. "जगभरची मुले आपल्या आयुष्याच्या पहिल्या पाच वर्षांत, कोणीही न शिकविता बोलायला शिकतात, त्यांना समजायला लागते, गोष्टी सांगतात, विनोद सांगतात, चित्र काढतात, गाणी म्हणतात, नव्या चाली लावतात, लुटूपुटूच्या कामांत मग्न होतात.... या साऱ्या गोष्टी कशा शिकतात, हे जरी कुणालाच माहीत नसले, तरी

मुले हे सारे आपणहून शिकतात. मग ती शाळेत जातात. आणि अचानक, तिथे आपण समजतो की त्यांना कसे शिकवावे, ते आपल्याला कळते. तिथे येऊन मात्र त्यांच्यापैकी अनेकजण नीट शिकतच नाहीत; हा एक केवढा विरोधाभास आहे!"

शाळांमधून विद्यार्थ्यांना विषय समजण्याचे काम होत नाही, ही शिक्षणावरील सर्वांत मोठी टीका आहे. त्यामुळे 'समजण्यासाठी शिक्षण' अशी संकल्पना गार्डनर आपल्यापुढे ठेवतात. त्याचबरोबर 'समजणे' या संज्ञेची व्याख्याही ते देतात. "ज्ञान, कौशल्ये, संकल्पना, वास्तव-माहिती प्राप्त करण्याची क्षमता; त्याचबरोबर एका परिस्थितीच्या संदर्भात–बहुधा शाळा–शिकलेली गोष्ट, अथवा ज्ञान, हे ज्याची आपण आगाऊ कल्पना केलेली नसेल, अशा नव्या परिस्थितीत, नव्या ठिकाणी वापरता येणे याला 'समजणे' असे म्हणता येईल."

अशा अर्थाने, 'समजण्या'साठी शिक्षण देता येईल, अशी भूमिका गार्डनर घेतात. 'आपण घेतलेले ज्ञान नव्या परिस्थितीत ज्याला वापरता येते तो ज्ञानी (expert)', अशीही एक व्याख्या गार्डनर देतात. थोडक्यात असे की, 'समजणे' ही एक क्षमता आहे. ती वाढणे हे शिक्षणाचे उद्दिष्ट आहे. प्राप्त झालेले ज्ञान अगदी अपेक्षित नसलेल्याही परिस्थितीत वापरता येणे हा, शिकलेले समजले आहे की नाही हे कळण्याचा निकष आहे; हे वापरणे अपुरेपणाने व चुकीच्या पद्धतीने मात्र होता कामा नये; आणि मुख्य म्हणजे, त्याने व तिने हा वापर कुणीतरी सांगून नव्हे, तर उत्स्फूर्तपणे केला पाहिजे; तसा करू शकले पाहिजे.

या मूलगामी दृष्टिकोणातून जेव्हा आपण आजचे, प्रचलित अभ्यासक्रम न्याहाळतो, तेव्हा लक्षात येते की त्यात, खोलवरची समज यावी, या उद्देशाने फारसे काहीच नसते. असलेच तर ते विद्यार्थ्यांना केवळ वरवरची समज देऊ पाहणारेच असते, अशी गार्डनर यांची टीका आहे.

आज, 'समजण्या'साठी शिक्षण होत नाही याची दोन कारणे, गार्डनर यांनी सादर केली आहेत. एक म्हणजे, या उद्देशाने कसे शिकवावे याची फारशी जाणच शिक्षकांना नसते आणि दुसरे म्हणजे, मुलांच्या मनांवर अनेक गोष्टींचा तसा पगडा असतो, अशा सवयी त्यांनी आधीच जोपासलेल्या असतात की ज्या, त्यांच्या समजावून घेऊन शिकण्याच्या मार्गात अडथळे म्हणून उभ्या ठाकतात.

गार्डनर हे त्यांच्या बहुविध बुद्धिमत्तांच्या सिद्धांतासाठी प्रसिद्ध आहेत. बुद्धिमत्तांच्या विविधतेमुळे ते व्यक्तिगत शिक्षणाचा आग्रह धरतात. त्यांच्या मते, मुलांची शारीर-वैज्ञानिक (biological) नि सांस्कृतिक (cultural) पार्श्वभूमी वेगवेगळी असते; त्यांचा वैयक्तिक इतिहास नि त्यांचे व्यक्तिगत अनुभव वेगवेगळे असतात. त्यामुळे मुले शाळेत प्रवेश करतात, तेव्हा ती 'कोरी पाटी' नसते. त्यामुळे बौद्धिक कामगिरीच्या एकाच अक्षावर त्यांना मोजता येईल, असे ते विद्यार्थी नसतात. वेगवेगळ्या पद्धतींनी घडलेली मने घेऊन मुले शाळांतून येतात, त्यांच्या सबलता, दुर्बलता, आवडी-निवडी आणि माहितीप्राप्तीच्या प्रक्रियाही भिन्न असतात. त्यामुळे साहजिकच सर्वांना एकच, एकदिश शिक्षण देणे, ही गोष्ट अनेकांवर अन्याय करणारीच असते.

या ग्रंथातील पाचव्या नि अखेरच्या भागात, मूल्यमापनापासून ते भावी काळातील शिक्षणात एकीकडे शास्त्रीयता आणि दुसरीकडे नैतिकता या घटकांना कसे एकत्र सामावून घ्यायला हवे, याची चर्चा असलेले पाच लेख समाविष्ट केले आहेत.

एकदा, 'समजण्यासाठी शिक्षण' हे उद्दिष्ट ठरले, म्हणजे मग वस्तुनिष्ठ स्वरूपाच्या परीक्षांनाही आपोआप फाटा मिळतो. प्रत्येक विद्यार्थी-विद्यार्थिनीला स्वतःला आपल्या 'तयारी'चा अंदाज वेळोवेळी मिळत राहावा लागतो; तसा तो संबंधित इतरांनाही कळावा लागतो. यासाठी मूल्यमापन असते. या दिशेने, गार्डनर यांनी संपूर्ण मूल्यमापन पद्धतीचे उदाहरणांसहित सविस्तर विश्लेषण केले आहे. (Assessment in context) 'द एज ऑव्ह इनोसन्स रिकन्सिडर्ड' या विविध उपयुक्त विचारांनी भरलेल्या लेखात आलेल्या प्रतीकव्यवस्था दृष्टिकोणाच्या (The symbol systems approach) विवेचनाचा आवर्जून उल्लेख केला पाहिजे. प्रामुख्याने भाषेशी परंतु सर्वच विषयांशी संबंधित अशा प्रतीक-व्यवस्थेचा केलेला ऊहापोह नवी दृष्टी देणारा आहे. शाळेचे मुख्य उद्दिष्ट काय असावे, याच्याशी हा विषय

गार्डनर यांनी जोडलेला आहे.

**भविष्याकरिता शिक्षण**

आजच्या जगात शिक्षणाविषयी अनेक नवे प्रश्न उभे राहिले आहेत. त्यांचाही वेध 'भविष्याकरिता शिक्षण' (An education for the future) या लेखात घेतला आहे. उदाहरणार्थ, सार्वजनिक की खासगी शिक्षण; जेव्हा देशात अनेक सांस्कृतिक गट वास्तव्य करून असतात, तेव्हा त्या संदर्भाने निर्माण होणारे शैक्षणिक प्रश्न, किंवा अगदी शिक्षणसंस्थांच्या अखत्यारीत येणारे, सैद्धांतिक की व्यावहारिक शिक्षण, अशा प्रश्नांची चर्चा गार्डनर यांनी केली आहे. शिक्षण हे प्रामुख्याने आंतरशाखीय (Inter-disciplinary) असते असे गृहीत धरून ते वेगवेगळ्या शालेय स्तरांवर कसे द्यावे, याचाही ऊहापोह या लेखात केला आहे. या लेखाच्या अखेरीस, गार्डनर यांनी, आपल्या मतार्थ, फ्रेंच नाटककार मोलियर याचे एक विधान उद्धृत केले आहे. "आपण जे काही करतो एवढ्याचपुरते नव्हे, तर आपण जे काही करत नाही यासाठीही आपण जबाबदार असतो." मला वाटते, शिक्षण संबंधित सर्वच घटकांनी हा संदेश आपल्या 'समजे'मध्ये आणायला हवा. यासाठी, अर्थातच, या विभागातील आणि एकूणच या ग्रंथातील अखेरचा व्यावसायिकांच्या नैतिक जबाबदाऱ्या सांगणारा (The Ethical Responsibilities of Professionals) लेख प्रत्येक शिक्षणसंबंधित प्रौढाने वाचला पाहिजे.

World Library of Educationalists Series-Routledge, London and New York. (2006)

☆☆☆



अनुक्रमणिका

## लेखकांचा परिचय

❋ **प्रा. डॉ. सुरेश भृगुवार**

बनारस हिंदू विद्यापीठातील मराठीचे प्राध्यापक (निवृत्त.) शैलीशास्त्राचे अभ्यासक. 'गोविंदाग्रजांची काव्यशैली', 'वाङ्मयीन शैली : तरंग-अंतरंग' या ग्रंथांचे लेखक.

***पत्ता :*** ५०४ पेरेग्राईन, रहेजा वुड्स, कल्याणी नगर, पुणे ४११ ००६. भ्रमणध्वनी : ९९२३०८०७५८.

❋ **प्रा. डॉ. अनिल सहस्त्रबुद्धे**

माजी प्राचार्य, पेमराज सारडा महाविद्यालय, अहमदनगर. ज्येष्ठ साहित्यिक, समीक्षक व संशोधक. लोकसाहित्याचे गाढे अभ्यासक.

***पत्ता :*** आई समर्थनगर, श्रीराम चौक पाईपलाईन रोड, अहमदनगर ४१४ ००३.
दूरध्वनी : ०२४१-२४२४१६७.

❋ **श्री. सी. पं. खेर**

क्रांतिकारी अर्थशास्त्रज्ञ जॉन मेनार्ड केन्स्, सौ. कुसुम खेर, पुणे (१९९७); राज्यार्थ शास्त्रज्ञ जॉन केनेथ गालब्रेथ, दिलीपराज प्रकाशन, पुणे (१९९९) व जागतिक अर्थशास्त्राचे बदलते संदर्भ, दिलीपराज प्रकाशन, पुणे(२००४) ही पुस्तके प्रसिद्ध.

***पत्ता :*** बी-७ (पूर्व) वृंदावन सोसायटी, रेंज हिल्स रोड, पुणे ४११ ०२०. भ्रमणध्वनी : ०२०-२५५६०१८२.

❋ **प्रा. माधव चोले**

राज्यशास्त्राचे अभ्यासक, देगलूर महाविद्यालय, देगलूर.

***पत्ता :*** देगलूर महाविद्यालय, देगलूर. भ्रमणध्वनी : ९९७०५६३३८५.

❋ **प्रा. श्री. मा. भावे**

माजी प्रपाठक व विभागप्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच्.डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षकचळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयांवर २५ शोधनिबंध प्रसिद्ध.

***पत्ता :*** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११ ००४. दूरध्वनी : (०२०) २५६७४०९३.

❋ **प्रा. रमेश पानसे**

प्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ. काही वर्षे अर्थशास्त्राचे पदव्युत्तर स्तरावरील प्राध्यापक. ग्राममंगल संस्थेकरवी आदिवासी भागात व अन्य ठिकाणी शिक्षणविषयक प्रयोग. आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक व साहित्य या विषयांवर विपुल लेखन. सुमारे ३० पुस्तके व ५०० च्या वर लेख.

***पत्ता :–*** ३१५, प्राज्ञपाठशाळा मंडळ, गंगापुरी, वाई ४१२ ८०३. भ्रमणध्वनी : ९८८१२३०८६९.

# लेखकांस आवाहन

'नवभारत' मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता' कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.
२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.
३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत' च्या संपादकांना द्यावी.
४. 'नवभारत' मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत' मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

संपादक मंडळ

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

## प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

| | सुधारित किंमत २० नोव्हेंबर २००६ पासून लागू |
|---|---|
| ■ वैदिक संस्कृतीचा विकास (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु |
| ■ अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु |
| ■ पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु |
| ■ हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु |
| ■ श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ | ६० रु |
| ■ संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी | ६० रु |
| ■ आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | १५० रु |
| ■ वागीश्वरी । डॉ. गो. के. भट | ६० रु |
| ■ गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | ४० रु |
| ■ इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | १३० रु |
| ■ शाहीर हैबती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु |
| ■ गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १४० रु |
| ■ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु |
| ■ बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प. ल. वैद्य | ५० रु |
| ■ हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु |
| ■ पाच पुस्तक-परीक्षणे । वा. म. कुलकर्णी | ६० रु |
| ■ भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | ३० रु |
| ■ कॉलिंगवुडची कलामीमांसा – एक भाष्य । रा. भा. पाटणकर | १०० रु |
| ■ धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि. के. बेडेकर | ३० रु |
| ■ आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्व आणि विचार | १०० रु |
| ■ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु |
| ■ इहवाद आणि सर्वधर्मसमभाव । मे. पुं. रेगे | १२० रु |
| ■ प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु |
| ■ चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु |
| ■ विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु |
| ■ नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन । द. ना. धनागरे | ४० रु |
| ■ प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु |
| ■ हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती) : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु |
| ■ पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास (दुसरी आवृत्ती) : प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही. पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता* : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)
फोन :(०२१६७)२२०००६

अनुक्रमणिका






# नवभारतास
# हार्दिक
# शुभेच्छा !

## – पु.ना. गाडगीळ आणि कंपनी यांच्याकडून

हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई